# नवभारत

जुलै २००९


आनंद यादव यांचा बोली-भाषा विचार,
प्रा. रत्नाकर मंचरकर

'तें.' - मरणोत्तर निरीक्षणे
प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे

काल आज आणि उद्या -
मार्क्सचे इतिहासाविषयीचे सिद्धान्त
साक्षी

स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या
साहित्यातील इतिहासदर्शन
डॉ. सो. रा. शेंडे













अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## तुम्हीच सांगा !

आज सकाळी माहित्ये
काय काय घडले ?
बुरखाधारी तीनजणांनी
मला पळवून नेले

कडेकडेने शाळेमध्ये
लागलो होतो जाऊ
त्यांनी मला धरले तेव्हा
देऊ लागले खाऊ
घेतला नाही जेव्हा खाऊ
मग तेव्हा तर
त्यांनी केला एकच हल्ला
पकडून माझी कॉलर
माझी त्यांनी वळली गठडी
सुसाट सुटली काळी गाडी
बांधून माझे मागे हात
करकचून तारेने जोरात

कानात बोळे भरल्यामुळे
कळले नाही कोण बोलले
डोळे मिटून बांधल्यामुळे
कळले नाही कोठे नेले
वीस मैल गाडी नेली
किंवा वीस मिनिटे गेली
तसेच त्यांनी मला खेचले
गार कुबट तळघरात नेले
डांबून मला एका कोपऱ्यात
खंडणी घेण्या गेले गावात
पहाऱ्यासाठी बंदूकधारी
रोखून बंदूक राखण करी
स्टुलास जखडून तेव्हा मी
काय माहीत किती बसलो,
सांगायचा मुद्दा काय,
ते नाही विसरलो
म्हणून तर आज मी
शाळेत उशिरा आलो.

---

## अपहरण

धावा धावा आली टोळी
पोरं पळवुन नेणाऱ्यांची
टोळी मधल्या लोकांची
भाषा पशू-पक्ष्यांची

पाऊसधारा, गार वारा
मला पकडून नेले घरा
बागेमधल्या तुरुंगाला
फुलपाखरांची टेहळणी

गवतावरची पाती मोजून
झाली माझी उजळणी

झऱ्याकाठी डांबून होतो
पहाऱ्यासाठी ससे
तुम्ही सांगा शाळेमध्ये
येणार तरी कसे ?

---

शेल सिल्व्हर्टन (१९३०-१९९९) नावाजलेल्या अमेरिकन कलावंताने लहान मुलांसाठी गाणी व कविता लिहिल्या व त्या अतिशय लोकप्रिय झाल्या.

त्यातील काही कवितांवर आधारीत, संतोष शिंत्रे आणि जयंत गाडगीळ यांच्या 'शेलक्या कविता' या संग्रहातील काही कविता आम्ही दरमहा प्रसिद्ध करणार आहोत. या अंकात दोन कविता दिल्या आहेत.

- संपादक

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६२। अंक १० । जुलै २००९
आषाढ/श्रावण शके १९३१
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रू. २५/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.








संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका






# नवभारत

## जुलै २००९

## अनुक्रमणिका


**आनंद यादव यांचा बोली–भाषा–विचार** ३

❖ प्रा. रत्नाकर मंचरकर

**'तें०' – मरणोत्तर निरीक्षणे ......** १८

❖ प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे

**स्वा. सावरकरांच्या साहित्यातील इतिहासदर्शन** २५

❖ डॉ. सो. रा. शेंडे

**काल, आज आणि उद्या -**
**मार्क्सचे इतिहासाविषयीचे सिद्धान्त** ३८

❖ साक्षी

# आनंद यादव यांचा बोली–भाषा–विचार

प्रा. रत्नाकर बापूराव मंचरकर

**०१. आनंद यादवांची ग्रामीण साहित्यसमीक्षा**

अभिजात साहित्यिक, चिकित्सक संस्कृतिमीमांसक आणि नववाङ्मयीन प्रवाहांचे संगोपक म्हणून आनंद यादव (जन्म ३० नोव्हेंबर १९३५) यांना आपण ओळखतो. कविता, कथा, कादंबरी, आत्मचरित्र, ललित गद्य आणि समीक्षा अशा विविध साहित्यप्रकारात त्यांनी मौलिक साहित्यनिर्मिती केली. समाजाशी जोडलेला पण कलेचे भान राखणारा साहित्यविचार त्यांनी आपल्या अध्यापनातून आणि लेखनातून प्रवाहित केला. उगवत्या लेखकांच्या नव्या पिढीची निगुतीने निगराणी केली. महात्मा फुले यांच्या सामाजिक परिवर्तनाच्या प्रेरणांना त्यांनी एक साहित्यिक आणि सांस्कृतिक प्रतिसाद दिला. अध्यापन, साहित्यनिर्मिती, साहित्यसमीक्षा आणि साहित्यचळवळ या विविध क्षेत्रात आनंद यादव यांनी केलेल्या कामाची दखल घेऊन मराठी रसिकांनी अखिल भारतीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा (महाबळेश्वर २००९) बहुमान कृतज्ञतापूर्वक त्यांना दिला आहे. या सन्मानपीठावर आरूढ होण्याचा ज्यांना रास्त अधिकार आहे त्यांचीच निवड झाल्याने मध्यंतरी बरीच वर्षे दुर्मीळ झालेला आनंद यावर्षी आपणा सर्वांना लाभला आहे. आनंद यादवांचे मनापासून अभिनंदन करून आणि त्यांना अंत:करणपूर्वक शुभेच्छा देऊन त्यांच्या भाषाविचाराकडे वळतो.

आनंद यादव यांचा भाषाविचार हा त्यांच्या ग्रामीण साहित्यसमीक्षेचा एक भाग आहे. ग्रामीण साहित्य मध्यवर्ती मराठी प्रवाहाची एक धारा म्हणून महात्मा जोतिबा फुले यांच्या लेखनासोबत वाहत आले आहे. गांधीयुगाने त्याला प्रतिष्ठा दिली आणि स्वातंत्र्याचा अनुभव जाणतेपणाने घेणारी पिढी साहित्यक्षेत्रात आली तेव्हापासून त्याला एक जोमदार प्रवाहाचे आणि चळवळीचे स्वरूप आले. कथा–कादंबरी या ठळक साहित्यप्रकारातील ग्रामीण साहित्य संख्येने विपुल आणि कसाने अस्सल आहे. तरीही मराठी समीक्षेने त्याची काहीशी आबाळ केल्याचेच दिसते. म. फुल्यांच्या 'तृतीय रत्न' (इ. स. १८५५) या ग्रामीण नाटकापासून ग्रामीण साहित्याचा आनंद यादवांचा 'ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि समस्या' (इ. स. १९७९) हा पहिला समीक्षाग्रंथ अवतरण्यास शंभराहून अधिक वर्षे लागावीत यातच सगळे आले. 'ग्रामीणता: साहित्य आणि वास्तव' (इ. स. १९८१) 'मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती' (इ. स. १९८५) अशी यादवांची तिन्ही पुस्तके पाच–सहा वर्षातलीच असली तरी त्यामागे इ. स. १९६५ पासून केलेले यादवांचे वीस वर्षांचे चिंतन आहे. यानंतर ग्रामीण साहित्याची समीक्षा करणारे पंधरा--वीस बहुतांशी स्फुट लेखसंग्रह प्रसिद्ध झालेले असले तरी ते सारे आनंद यादव यांच्या समीक्षाविचाराच्या छायेखाली आणि यादवांना वाट पुसतच.

आनंद यादव यांच्या तिन्ही समीक्षाग्रंथांचे स्वरूपही स्फुट लेखसंग्रहांचेच आहे. इ. स. १९६८ ते १९८५ या दीड तपाच्या काळात लिहिलेल्या त्यांच्या चव्वेचाळीस लेखांचा विस्तार पाचशे बेचाळीस पृष्ठांचा आहे. विविध निमित्ते, कारणे आणि उद्दिष्टे यामुळे झालेले हे लेखन आहे. त्यामुळे त्यात सलग ग्रंथाचा बांधीवपणा किंवा सुसूत्रता नाही. सगळे लेख सारख्या दर्जाचे आहेत असेही नाही. विषयांची संकीर्णता प्रत्येक पुस्तकात आहे. खरे तर या पुस्तकांतील लेखांचे विषयानुसारी वर्गीकरण करून त्यांच्या नव्या आवृत्त्या काढावयास हव्यात. काही ठिकाणचे विवेचन कोणाला 'क्वचित खारट–तुरट, एकांडे वाटण्याचाही संभव.' त्यात पुष्कळ ठिकाणी पुनरुक्ती आहे. परस्परविरोधी विधाने व विसंगतीही आहे. असे काही ऊणे–अधिक असले तरी आनंद यादवांच्या ग्रामीण साहित्य समीक्षेचे ऐतिहासिक महत्त्व, विविधता, व्यापकता आणि अंगभूत गुणवत्ता नाकरता येण्यासारखी नाही.

या लेखनामागे ग्रामीण साहित्य, समाज व संस्कृती याविषयीचा आत्यंतिक जिव्हाळा आहे. ग्रामीण साहित्याची








पायाभूत प्रमेये आणि त्यातून आकाराला येणारी बैठक जाणून घ्यावी आणि समजून द्यावी, या उद्देशाने हे लेखन झाले आहे.

यादवांच्या समीक्षेचा एक धागा ऐतिहासिक विचाराचा आहे. ग्रामीण साहित्याच्या अर्वाचीन उद्गमापासून तो १९८५ पर्यंत जे जे घडले त्याचा धांडोळा घेऊन फलश्रुतीसह येथे नोंदविले आहे. म. फुले, श्री.म. माटे, र.वा.दिघे, बहिणाबाई चौधरी या मातब्बर लेखकांचे पुनर्मूल्यांकन करून त्यांच्या योगदानाकडे यादवांनी आपले लक्ष वेधले आहे. व्यंकटेश माडगूळकर, द. मा. मिरासदार आणि शंकर पाटील या ज्येष्ठांच्या पिढीचे परखड मूल्यमापन केले आहे. चि.त्र्यं.खानोलकर, जी. ए. कुलकर्णी, श्रीनिवास कुलकर्णी, अनिल अवचट यासारख्या ग्रामीण साहित्याच्या सीमेला स्पर्श करणाऱ्या लेखकांच्या लेखनातील ग्रामीणतेची तपासणी केलेली आहे. कथा, कविता, कादंबरी, समीक्षा या महत्त्वपूर्ण साहित्य-प्रकारातील निर्मितीची वाटचाल अधोरेखीत केली आहे. या वाटचालीचे समकालीन वाङ्मयीन वातावरण व सामाजिक स्थित्यंतरे यांच्याशी असलेले संबंध व परिणाम लक्षात घेतले आहेत. महत्त्वाचे टप्पे जवळून न्याहाळले. आहेत. ग्रामीण साहित्याची वळणे–वाकणे टिपून यादवांनी त्याची ऐतिहासिक संगती लावली आहे. ग्रामीण साहित्याच्या इतिहासाची जी मांडणी या वेगवेगळ्या लेखांमधून यादवांनी केली आहे ती आजही स्थिर आहे.

भूतकाळाबरोबर समकाळाकडे आणि नव्या वर्तमान पिढीकडेही यादवांनी सहृदयतेने पाहिले आहे. रा. रं.बोराडे, महादेव मोरे, उत्तम बंडू तुपे, सखा कलाल, चंद्रकुमार नलगे, चारूता सागर, द. ता. भोसले अशा किती तरी लेखकांविषयी त्यांनी आत्मीयतेने लिहिले आहे. त्यांच्या अडचणी मांडल्या आहेत. नव्या उगवत्या पिढीचे संगोपान करणे, त्यांच्या वाङ्मयविचाराला दिशा देणे आणि त्यांच्या साहित्यसाधनेला निरनिराळ्या वाटा दाखविणे हे काम त्यांनी आस्थेने केले आहे.

यासाठीच आपल्या ग्रामीण साहित्यनिर्मितीची प्रक्रिया, प्रेरणा आणि प्रयोग यांचे आत्मानुभव त्यांनी डोळसपणे मांडले आहेत. र. वा. दिघे, विभावरी शिरूरकर, ग. ल. ठोकळ, रणजित देसाई यांच्या कादंबरीलेखनाची निर्मितीप्रक्रिया त्यांच्याच शब्दात टिपली आहे आणि हलक्या हाताने उलगडून दाखविली आहे. खेड्यापाड्यात एकाकीपणाने साहित्यसाधना करणाऱ्या तरूण लेखकांसमोर काही नमुने ठेवण्याचा हा प्रयत्न आहे.

वास्तवता हा ग्रामीण साहित्याचा प्राणधर्म. त्यामुळे ग्रामीण साहित्याचे समाज आणि संस्कृती यांच्याशी विविधांगी संबंध निर्माण होतात. या संबंधांचा शोध घेताना 'सत्यकथे' सारख्या वाङ्मयीन नियतकालिकाची भूमिका काय असावी याची यादव चर्चा करतात. ग्रामीण साहित्याची चळवळ तिचा साहित्यानिर्मितीवरील परिणाम तपासतात. ग्रामीण साहित्याच्या आकलन – आस्वादनात निर्माण होणाऱ्या अडचणी आणि त्या दूर करण्याच्या दिशा सूचित करतात. खेडी आणि शहरे यांच्याशी असलेले ग्रामीण साहित्याचे नाते शोधतात. 'जुने आणि नवे खेडे', 'बदलते खेडे आणि ग्रामीण साहित्य' यांचा विचार करून 'उद्याची खेडी उद्याची साहित्यकेंद्रे होतील' असा विश्वास व्यक्त करतात. 'शहरी संस्कार', 'शहरी अभिरूची आणि शहरी मानदंडांचा मानसिक जुलूम' यांच्याशी होणारा ग्रामीण साहित्याचा टकराव त्यांनी टिपला आहे. सावधगिरीचे इशारे दिले आहेत.

ग्रामीण साहित्यविश्वाचा मूलगामी शोध घेताना त्याचा सांस्कृतिक संदर्भ त्यांच्या विवेचनात असा सतत जागता राहिला आहे. त्याच वेळी त्यातील कलात्मकताही ते करड्या नजरेने न्याहाळतात. वास्तवाला कलात्मकतेची अपरिहार्य जोड असली पाहिजे; असा त्यांचा आग्रह आहे. त्यामुळे ग्रामीण साहित्यातील सामाजिक जाणिवांचा ते जसा वेध घेतात त्याप्रमाणे त्यातील कलात्मकतेचीही तपासणी करतात. 'ग्रामीणता', 'प्रादेशिकता', मराठी साहित्याचे 'साहित्यपण', 'देशीपण' अशा कळीच्या संकल्पनांची त्यांनी तत्त्वचर्चा केलेली आहे. 'ग्रामीणता हे ग्रामीण साहित्याचे पथ्य आहे' या विचारापासून 'ग्रामीणता हे मराठी साहित्याचे आत्मिक मूल्य आहे' या विचारापर्यंत त्यांचा विकास झाला. यादवांची तत्त्वचर्चा पुष्कळदा अमूर्त सांकल्पनिक पातळीवर राहत नाही. आपल्यासमोरचे प्रश्न आपल्यासमोर चाललेल्या विशिष्ट साहित्यव्यवहाराशी थेटपणे भिडविणे त्यांना अधिक मानवते. साहित्यतत्त्वांपेक्षा आपल्या सर्जनविषयक अनुभवांवर अधिक विसंबून

राहण्याची त्यांची रीत आहे. अखेर ही एका प्रतिभावंत लेखकाची समीक्षा (पोएट. क्रिटिक) आहे. त्यांच्या समीक्षेच्या मर्यादा आणि सामर्थ्य त्यातून उद्भूत होते. ते काहीही असले तरी मराठी ग्रामीण साहित्याची ही पहिलीच विस्तृत आणि तळमळीने केलेली पायाभूत चिकित्सा आहे. तिचा प्रभाव गेली वीस-पंचवीस वर्षे कायम आहे, पुढेही दीर्घकाळ राहील.

**०२ आनंद यादवांचा बोली-भाषा विचार**

आनंद यादवांनी ग्रामीण साहित्य चळवळीला घडविले-वाढविले त्याचप्रमाणे चळवळीनेहीं त्यांच्यातील लेखकाला नवी जाग आणली. 'सत्यकथे'ने निर्मिलेल्या कलावादी विचारविश्वात व संस्कारात वाढलेले यादव कलात्मकतेच्या कोषात बंदिस्त होऊन साहित्यनिर्मिती करीत होते. चळवळीमुळे त्यांचे लेखन 'गोतावळा', 'उखडलेली झाडं', 'मायलेकरं', 'झोंबी', 'नांगरणी', 'घरभिंती', 'काचवेल' असे कलात्मकता टिकवून अधिक समाजनिष्ठ झाले. त्याप्रमाणात त्याला वाङ्मयीन महत्तेचा स्पर्श झाला.

आनंद यादव आणि ग्रामीण साहित्याची चळवळ यांचे परस्परांशी असे द्वंद्वात्मक नाते आहे. याच नात्याचा प्रत्यय त्यांच्या बोलीभाषा विचारातही दिसून येतो. यादृष्टीने त्यांचे पुढील लेखन माझ्यासमोर आहे.

१. 'ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि समस्या', मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, १९७९, प्रस्तावना : गो.म.कुलकर्णी, सोळा लेखांचा संग्रह, पृष्ठे १९१. (संक्षेप : स्वरूप) क्रमांक

७. ग्रामीण साहित्याची भाषा, पृष्ठ - ८४ ते ९७.

८. ग्रामीण साहित्याच्या भाषेच्या मर्यादा आणि विकासाच्या दिशा - ९८ ते १०७

२. 'मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती', मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे द्वितीयावृत्ती, १९९३ (प. आ. १९९३). सोळा लेखांचा संग्रह, पृ. ८ + १९६ (संक्षेप : संस्कृती)

५. ग्रामीण भाषेचा वाङ्मयीन प्रवास - ३४ ते ५०

६. साहित्यातील प्रमाणभाषा आणि - ५१ ते ६५ ग्रामीण भाषा

मुख्यतः हे चार लेख डोळ्यासमोर ठेवून आनंद यादवांच्या बोलीभाषाविचाराची मांडणी व तपासणी येथे केली आहे. संदर्भ देताना ग्रंथनामाचा संक्षेप, लेखाचा क्रमांक व पृष्ठक्रमांक विवेचनातच कंसात दिले आहेत. त्याशिवाय वेगळे संदर्भ लेखाच्या शेवटी नोंदविले आहेत.

**०३. ग्रामीण साहित्याची भाषा**

इ. स. १९६०-६१ पासून आनंद यादव यांचे ग्रामीण साहित्य 'सत्यकथे'सारख्या सुप्रतिष्ठित मासिकातून प्रसिद्ध होऊ लागले. तेव्हापासून साहित्यातील ग्रामीण भाषेवर वेगवेगळे आक्षेप घेतले जाऊ लागले. ग्रामीण बोलीतील साहित्य कळणे वाचकाला अवघड जाते. ग्रामीण साहित्य बोलीतच लिहिले गेले तर त्याचा वाचकवर्ग मर्यादित होईल. त्यामुळे ग्रामीण साहित्य नागर भाषेत लिहिणेच योग्य ठरते. निदान निवेदन नागर व संवाद ग्रामीण ही पद्धती वापरणे अधिक श्रेयस्कर. ग्रामीण साहित्यासाठी ग्रामीण बोली वापरणे जर अपरिहार्य वाटते तर सगळेच ग्रामीण साहित्य बोलीत का लिहिले जात नाही? असा त्या काळातल्या मान्यवर कथाकारांचा, कवींचा व टीकाकारांचा सूर होता. साहित्यक्षेत्रात नव्याने प्रवेश केलेले यादव या व अशा प्रश्नांनी गांगरून जात. तरीही आपण जी ग्रामीण बोली वापरत आहोत ती उचित आहे; असे त्यांना मनोमन वाटत असे. त्यातून ग्रामीण साहित्याची भाषा या विषयाच्या विचाराकडे ते वळाले. (स्वरूप ७/पृ. ८४, ९०-९१ संस्कृती/ प्रास्ताविक, पृष्ठांक नाही)

कलामाध्यमाचा प्रश्न हा कलानिर्मिती प्रकियेचा भाग असतो. अशी या प्रश्नाची स्थाननिश्चिती त्यांनी आरंभीच केली आहे. त्यानुसार ग्रामीण साहित्याची भाषा गामीण की नागर हा प्रश्न वाचकांनी किंवा टीकाकारांनी सोडवायचा नसून लेखकाने सोडवायचा प्रश्न आहे; अशी भूमिका त्यांनी घेतली. (स्वरूप ७/पृ. ८४).

निर्मितिप्रक्रियेच्या अंगाने ते प्रथम लेखकाचा अनुभव आणि भाषा यांचे नाते सांगतात. ग्रामीण जीवनाचा अनुभव घेत असताना ग्रामीण बोलीही त्या अनुभवाचा भाग म्हणून लेखकाला जाणवत असते. त्यामुळे अनुभव व्यक्त करताना त्याला ती भाषा टाळता येत नाही. त्याचप्रमाणे अनुभवावर दुसरी भाषाही चढविता येत नाही. (स्वरूप ७/पृ. ८६)

शास्त्रामध्ये भाषा अर्थव्यक्तीचे साधन असते तर








कलेमध्ये ती माध्यमाचे काम करते. कलावंताला अर्थाच्या द्वारे फक्त माहिती द्यायची नसते. त्याला शब्दाचे व्यक्तित्व, सत्त्व, चैतन्य आणि सौंदर्य यांचा अर्थासह वापर करून अनुभवाला व्यक्त करावयाचे असते. 'माझे बोट कापले' आणि 'माझं बॉट कापलं' ही दोन्ही वाक्ये जवळपाससारख्या अर्थाची. पण त्यातून व्यक्त होणारे अनुभव कसे वेगवेगळे असतात आणि ते क्रमाने नागर व ग्रामीण अनुभवांची अनुभूती कशी देतात याचे मार्मिक विवेचन यादवांनी केले आहे. (स्वरूप ७/पृ.८५ते ८७).

लेखकाने माध्यमाकडे जाणीवपूर्वक व अभ्यासपूर्वक लक्ष द्यावे लागते त्याप्रमाणे त्याला कथेचा स्वभाव ओळखूनही माध्यम वापरावे लागते. यादृष्टीने निवेदनशील कथा आणि आविष्कारशील कथा असे दोन प्रकार कल्पून भाषा कशी बदलते याविषयीचे विवेचन यादवांनी केले आहे. (स्वरूप ७/पृ. ८८-९७) त्यातील संदिग्धता, परिभाषेची गल्लत आणि परस्परविरोध थोडा बाजूस ठेवून यादवांना अभिप्रेत असलेला अर्थ आपण आधी पाहू.

भाषेद्वारा निवेदन व भाषेद्वारा आविष्कार यातील फरक ते सांगत आहेत. निवेदनापेक्षा आविष्कारात भाषामाध्यम अधिक सूक्ष्म, बारकाव्याचे, नक्षीचे, उत्कट व सजीव होते. आविष्कार पात्राच्या भाषेतून प्रकट होतो. त्या भाषेला त्या प्रकारच्या पात्राचा, त्याच्या सामाजिकतेचा, त्याच्या संस्कृतीचा, त्या प्रदेशाचा व पात्राच्या भावभावनांचा वैशिष्ट्यपूर्ण संदर्भ असतो. त्यात त्या भाषेचे सत्त्व, त्याचे व्यक्तित्व, त्याचे चैतन्य असते. (स्वरूप ७/पृ. ९१)

काही उदाहरणांनी यादवांनी हा मुद्दा स्पष्ट केला आहे. 'देवा सटवा महार' या कथेत व्यंकटेश माडगूळकर उन्हातान्हातून हिंडल्याने देवाची झालेली अवस्था निवेदन करतात. अनुभव साक्षातपणे चित्ररूपाने उभा न करता अनुभव व वाचक यांच्यामध्ये उभे राहून कथा सांगण्याची भूमिका माडगूळकर स्वीकारतात. एक प्रकारचा मानसिक अलिप्तपणा, प्रतिष्ठित वाङ्मयीन भाषेचे संस्कार, आपल्या मध्यमवर्गीय वाचकाला समजले पाहिजे याचे भान यासारख्या कारणांमुळे माडगूळकरांच्या कथेतील अनुभवाचा भोग व त्याची अभिव्यक्ती यावर मर्यादा पडतात. त्याचा परिणाम म्हणून माडगूळकर ग्रामीण भाषेला नागर रूप देतात आणि त्रयस्थपणे निवेदन करतात (स्वरूप ७/पृ. ९२-९३).

शंकर पाटीलही 'ऊन' या कथेत उन्हातून चालणाऱ्या रामूचे असेच वर्णन करतात. येथला भाषेचा सगळा बाज ग्रामीण आहे. तथापि नागर वाचकांची सोय पाहण्यासाठी त्यांनी तिच्यावर नागर भाषेचा मामुली रंग दिलेला आहे. त्यामुळे त्यातील ग्रामीण स्पंदन गुदमरत आहे. ग्रामीण भाषेचा नाद, सूर, बद्द वाजत आहे. पाटलांनी येथे अकारण ग्रामीण भाषेच्या स्वभावधर्माला उपरे शहरी सदरे घातले आहेत, असे दिसते. ह्याच उताऱ्याचे ग्रामीण बोलीत पुनर्लेखन केले तर त्यातील ग्रामीणता कशी उठावदार होते व तिचा सूर कसा अस्सल होतो, ते यादवांनी दाखवून दिले आहे. (स्वरूप ७/पृ. ९३-९५).

यानंतर आनंद यादवांनी स्वतःच्या 'गाळ' या कथेतील एक ग्रामीण बोलीतील उतारा समोर ठेवला आहे. ह्या उताऱ्याचे नागर भाषेत पुनर्लेखन केले तर त्यातील ग्रामीण कष्टकऱ्याची मनोवस्था आणि वातावरणाची लय कशी हरवते; ते त्यांनी दाखवून दिले आहे. ग्रामीण अनुभवाचे असे अनेक सूक्ष्म बारकावे आडमुठेपणाने आणि अट्टहासाने नागर भाषेत लिहिताना नाहीसे होतात. (स्वरूप ७/पृ. ९५-९६). असा आपला अनुभव त्यांनी सांगितला आहे.

वाचकाच्या सोयीसाठी ग्रामीण बोली नाकारणे योग्य नाही. त्याचप्रमाणे सरसकट ग्रामीण बोलीच वापरावी हाही आग्रह नसावा. लेखकाचा प्रतिभाधर्म, साहित्यप्रकारचे स्वरूप, साहित्यगत अनुभवाचे मागणे हे लक्षात घेऊनच स्वाभाविकपणे भाषेचे माध्यम दक्षतापूर्वक वापरावे; असेच यादवांना अभिप्रेत आहे. ही भाषा केवळ नागर असेल किंवा केवळ ग्रामीण असेल तर कधी ती दोन्हींचे मिश्रण असेल. तिचे स्वरूप हे जे व्यक्त होऊ पाहत आहे त्यावर अवलंबून असते. (स्वरूप ७/पृ. ९६-९७ संस्कृती ५/पृ. ४६-४८) असे त्यांनी म्हटले आहे.

आनंद यादव यांच्या लिखाणाला त्या काळाचा संदर्भ आहे. तो लक्षात घेऊनच ते समजून घ्यावे लागते.

अनुक्रमणिका

तत्कालीन वाङ्मयव्यवहारात लेखक आणि वाचक हे दोन्ही ही मोठ्या प्रमाणावर पांढरपेशा वर्गातून आलेले शहरी शिक्षित होते. ग्रामीण साहित्याच्या आकलन–आस्वादनात ग्रामीण जीवनशैलीप्रमाणेच ग्रामीण बोलीचे मर्यादित ज्ञान हा त्यांच्या दृष्टीने एक अडथळा होता. आज हे चित्र बदलले आहे. बोली हीच ज्यांची व्यवहारभाषा आहे असे लेखक–वाचक खेड्याप्रमाणे शहरातही आहेत. आजचा वाचकवर्ग बहुजिनसी आणि बहुघटकात्मक बनला आहे. आज बोलीचा वापर आक्षेपार्ह राहिलेला नाही. त्यामुळे आरंभी ज्या प्रश्नांचा यादवांनी उल्लेख केला आहे ते आज गतार्थ झालेले आहेत. तो संक्रमणकाळ असल्याने त्यावेळी मात्र या आक्षेपांना उत्तर देण्याची गरज होती.

या प्रश्नांची उत्तरे देताना यादवांनी स्वीकारलेली भूमिका योग्य आहे. वाद टाळून ते समंजसपणे मार्ग काढताना दिसतात. त्यांचे निष्कर्षही योग्य आहेत. उदाहरणे मार्मिक आहेत. भाष्य चांगले आहे. समोर असणाऱ्या साहित्यगत विशिष्ट वास्तवाचा उलगडा करण्याचा प्रयत्न ते करीत आहेत. विगमनात्मक शोधनाचा नमुना म्हणून त्याकडे पाहता येईल. कोणत्याही चर्चेच्या प्रारंभकाला असेच करावे लागते.

यादवांचे मुद्दे बरोबर असले तरी त्यांची मांडणी करताना त्यांनी संज्ञा, संकल्पना, तत्त्वे आणि तथ्ये यांचा गोंधळ केलेला आहे. शास्त्रीय लेखनपद्धतीचा वापर केलेला नाही. त्यामुळे त्यांनी जे युक्तिवाद केले आहेत, विधाने केली आहेत त्यात काहीसा कच्चेपणा राहिला आहे आणि चुका झाल्या आहेत.

त्यांच्या विवेचनात एक संदिग्धता, धूसरता आहे. नेमके पारिभाषिक शब्द ते वापरीत नाहीत. 'भाषाविज्ञान' ऐवजी ते 'भाषाशास्त्र' म्हणतात. 'ग्रामीण बोली' ऐवजी 'ग्रामीण भाषा' म्हणतात. "वाचकावर भान ठेवणारी" (पृ. ८८) अशी सैल शब्दयोजना करतात. कधी कथेला आविष्कारशील म्हणतात तर कधी लेखकाच्या वृत्तीला आविष्कारशील म्हणतात (पृ. ८८). निवेदन, कथन आणि भाषाशैली य़ांना एक मानून विवेचन करतात. त्यामुळे त्यात अकारण गुंतागुंत निर्माण होते.

'निवेदनशील कथा' आणि 'आविष्कारशील कथा' या शब्दांबाबत ते म्हणतात" .... मी हे शब्द (दुसरे चांगले शब्द सुचत नाहीत म्हणून म्हणा पाहिजे तर) वापरत आहे." (पृ. ८८) हा खुलासा यादवांचे चाचपडणे दाखवीत आहे. खरं तर यादवांना येथे कथन (टेलिंग) व दर्शन (शोइंग) यामधील भेद सांगावयाचा आहे. पण तो त्यांनी नेमकेपणाने सांगितलेला नाही. त्यामुळे अकारण वाद, शंका, आक्षेप उत्पन्न होतात.

विशिष्ट प्रदेशाची प्राकृतिक वैशिष्ट्ये, निसर्गाचे वेगळेपण, तेथील लोकांची जीवनशैली, त्यांच्या सामाजिक--सांस्कृतिक परंपरा यांचे प्रतिबिंब त्या त्या ग्रामीण बोलीत उमटलेले असते. त्यामुळे अशा साहित्यातील पात्रांची भाषा, त्यांचे संवाद बोलीत असावेत अशी स्वाभाविक अपेक्षा असते. या बोलीतून त्या पात्रांची स्वभाववैशिष्ट्ये आणि त्यांची भूमीविशिष्ट संस्कृती आविष्कृत होत असते. याविषयी कोणाचा वाद असत नाही.

वाद निर्माण होतो तो त्यातील निवेदनाच्या भाषेविषयी "ग्रामीण भाषाच तेवढी खेड्यातील लोकांना कळते आणि नागर वळणाची भाषा कळत नाही, असे म्हणणे, तसेच ग्रामीण भाषा ही त्यांना जवळची वाटते व नागर भाषा परकी वाटते असे महाराष्ट्रातील खेडेगाव माहीत असणारा कोणीही मनुष्य म्हणणार नाही."[०१] असे ग्रामीण कथेच्या निवेदनासाठी नागर भाषेची तरफदारी करताना गो. मा. पवार यांनी म्हटले आहे. हे विधान योग्यच आहे. पण यादवांचा रोख खेड्यातल्या लोकांना काय व किती कळते यावर नसून शहरी वाचकांना बोली पुरेशा कळाव्या म्हणून नागर व ग्रामीण भाषांची सोयीने सरमिसळ करण्याच्या ग्रामीण लेखकांच्या पद्धतीवर आहे.

शतकानुशतकांच्या साहित्यिक वापरामुळे नागरभाषा जशी अर्थसमृद्ध आणि समर्थ झाली आहे तशी ग्रामीण बोली नाही; असाही मुद्दा पवारांनी उपस्थित केला आहे. तो यादवांनाही मान्य होण्यासारखा आहे. तथापि अशा मुद्यांच्या आधारावर "..... सरसकट ग्रामीण कथेची भाषा ही केवळ ग्रामीण असावी हा यादवांचा आग्रह अनाठायी आहे."[०२] असा जो शेरा पवारांनी दिला आहे तो अन्यायकारक आहे. असा आग्रह यादवांनी धरलेला नाही. केवळ ग्रामीण, केवळ नागर किंवा दोन्हींचे मिश्रण हे तिन्ही प्रकार कथेच्या गरजेनुसार त्यांनी स्वीकार्य

मानले आहेत. (स्वरूप ७/पृ. ९६-९७, संस्कती ५/ पृ. ४६-४८).

"इथे ग्रामीण की शहरी हा मुद्दा गौण आहे"[०३] असे पवार म्हणतात. खरं तर हाच मुद्दा यादवांच्या विवेचनात प्रधान आहे. निवेदनाचा भाषेचा स्तर ग्रामीण कलानुभवावर कोणता परिणाम करीत असतो; हाच त्यांच्या विवेचनाचा विषय आहे.

यादवांच्या सैलसर विवेचनशैलीमुळे ग्रामीण कथेचे निवेदन नागर असते आणि तिचा आविष्कार ग्रामीण असतो; अशा तऱ्हेचे अयुक्त समीकरण तयार होते. निवेदन करणारा लेखक शिक्षित असतो. तृतीयपुरुषी निवेदनाची भाषा ही त्या 'लेखकाची भाषा' (स्वरूप ८/ ९०) असते. त्यामुळे नागर भाषा माध्यम म्हणून अपरिहार्यपर्ण येते. असे यादव म्हणतात. येथे ते लेखक आणि संहितागत निवेदक यांना एकच समजतात. पण ते एक नसून भिन्न असू शकतात, असे ध्यानी घेतले तर निवेदनाची भाषा अपरिहार्यपणे नागर असण्याची गरज राहत नाही.

यादवांचा प्रतिवाद करताना गो. मा. पवार यासंदर्भात म्हणतात, "पात्रांचे बोलणे व लेखकाचे निवेदन यातून कथेचे सर्जन घडते ..... ग्रामीण कथेच्याबाबत निवेदक म्हणून लेखकाने आपला वेगळेपणा ठेवायचा असेल तर नागर भाषा वापरणे अपरिहार्य आहे. त्याने पात्राचीच ग्रामीण भाषा वापरली तर लेखकाचा वेगळेपणा राहणार नाही."[०४] पवारांनीच उदाहरण म्हणून दिलेल्या 'लक्तरे' या कथेत गंगाधर गाडगीळांनी एकाच नागर भाषेचा वापर करून हा वेगळेपणा दाखविला आहे. मग तो एकाच बोलीचा वापर करून का दाखविता येणार नाही? त्यामुळे निवेदन नागरच असले पाहिजे, हा पवारांचा आग्रहही अनाठायी ठरतो. लेखक आणि पात्र यांच्या भाषेत पवार म्हणतात तसा भाषेचा वेगळेपणा नसतो; तर भाषेचा वेगळा वापर असतो.

निवेदनशील कथेपेक्षा आविष्कारशील कथा अधिक चांगली; असा जो सूर यादवांच्या लेखनात आहे तोही तितकासा योग्य नाही. पवार म्हणतात त्याप्रमाणे तृतीयपुरुषी निवेदन कथेमध्ये अजिबात टाळावयाचे व पात्रालाच बोलू द्यायचे; असे लेखन समाजचित्रणाच्या दृष्टीने किरटे होत जाते. पुष्कळ ठिकाणी तृतीयपुरुषी निवेदनाची कलात्मकता अपरिहार्यपणे जाणवते.[०५] खरं तर हा मुद्दा कथन आणि दर्शन यांच्या अंगभूत बलाबलाचा आहे. त्याचा निर्णय काहीही झाला तरी दोन्हींचीही कथात्म साहित्यात अपेक्षा व आवश्यकता मान्य करावी लागते.

असा सगळा गोंधळ दूर करावयाचा असेल तर कथात्म साहित्यातील निवेदक व निवेदन यांचे स्वरूप स्पष्ट करून घेणे आवश्यक आहे. कथेतील कल्पित विश्वाकडे निवेदक आपल्या विशिष्ट दृष्टीने (पॉइंट ऑफ व्ह्यू) पाहत असतो. हा निवेदक सर्व जाणणारा, सर्व पाहणारा असा सर्वज्ञ सर्वसाक्षी असू शकतो. त्याचप्रमाणे कथागत पात्रांप्रमाणे एक निरीक्षकही असू शकतो. कधी तो त्रयस्थ असतो तर कधी कथागत पात्रही असू शकतो. हा निवेदक कथेचे कथन विशिष्ट भाषेत, विशिष्ट पद्धतीने आणि विशिष्ट शैलीने करीत असतो. याला निवेदकाचा 'आवाज' म्हणतात. निवेदकाची भाषा नागर आहे की ग्रामीण बोली आहे याचा संबंध या 'आवाजा'शी असतो. निवेदक त्रयस्थ आहे की पात्रमुखी आहे याचा संबंध निवेदकाच्या दृष्टिकोणाशी असतो. अशा स्थितीत तृतीय पुरुषी निवेदकाचे निवेदन नागर व पात्रमुखी निवेदकाचे निवेदन ग्रामीण बोली असा नियम स्वीकारता येणार नाही. त्या त्या विशिष्ट कथेवर ते अवलंबून असेल.

'दृष्टिकोण' आणि 'आवाज' यांना अनुसरून निवेदकाच्या निवेदनपद्धतीचे स्वरूप ठरत जाते. अनुभव घेण्याच्या व सांगण्याच्या पद्धतीप्रमाणे कथन (नॅरेशन), वर्णन (डिस्क्रिप्शन), संवाद (डायलॉग) आणि भाष्य (कॉमेंटरी) असे निवेदनाचे चार मूलभूत प्रकार अस्तित्वात येतात. त्यांच्या गरजेनुसार केलेल्या वापरातून कथासंहिता घडत जाते.

येथे 'कथन' (टेलिंग) व 'दर्शन' (शोइंग) यातील फरक लक्षात घेता येईल. इ. एम. फार्स्टर, पर्सी लबक, वेन सी. बूथ, रॉबर्ट स्कोल, रॉबर्ट केलॉग यांनी कथात्म साहित्याच्या संदर्भात, विशेषतः पात्रचित्रणाच्या बाबतीत, या भेदाची चर्चा केलेली आहे वर्ण्य पात्र-प्रसंग, भावविचार, वातावरण हे सर्व कुणीतरी बघत आहे व आपणास समजून सांगत आहे अशा पद्धतीने कथन केले जाते. येथे निवेदकाच्या कमी जास्त निरीक्षणाचा व दृष्टिकोणाचा

कथनावर परिणाम होत असतो. त्याद्वारे तो वर्ण्य विषयाचे मूल्यही अप्रत्यक्षपणे सुचवीत असतो. वर्ण्यविषय आपणास निवेदकाच्या दृष्टीने समजतो व तो तसाच समजावा असा निवेदकाच्या हेतूही असतो. व्यंकटेश माडगूळकरांची कथा अशी कथनपर आहे, हे उघड आहे.

दर्शनात्मक चित्रणात वर्ण्य विषयाचे दर्शन घडविण्यापुरतेच निवेदकाचे नाममात्र अस्तित्व असते. मूर्त कल्पना, संवेदना, हालचालीतील लकबी, संवाद, साधी शब्दकळा व निवडक तपशील यांचा वापर करून जे घडले, जसे घडले ते तो तसेच वाचकांसमोर ठेवीत असतो. अशा दर्शनात्मक चित्रणामुळे वर्ण्य अनुभव अधिक मूर्त, काहीसा इंद्रियगोचर होतो. त्यात एकप्रकारचा जिवंतपणा येतो.

शब्दमाध्यमाच्या मर्यादेत कल्पितविश्व लेखकाने 'सांगणे' आणि 'दाखविणे' यातला हा फरक आहे. वाचकाच्या दृष्टीने 'ऐकणे' आणि 'पाहणे', 'समजणे' आणि 'जाणवणे' यात जो फरक आहे तोच 'कथन' आणि 'दर्शन' यांच्या परिणामातील फरक आहे.

'आविष्कार' या संज्ञेचा वापर करून यादव जे विवेचन करीत आहेत, उदाहरणे देत आहेत त्यावरून ते पात्रमुखी निवेदनाविषयीच बोलत आहेत, असा ग्रह होतो. तसा तो पवारांनी करूनही घेतलेला आहे. तथापि यादवांना येथे दर्शनात्मक चित्रण अभिप्रेत आहे, असे मानणे अधिक योग्य आहे.

या विवेचनाच्या प्रकाशात यादवांच्या विवेचनाची मांडणी आरंभी केली आहे. व्यंकटेश माडगूळकर यांची कथा कथनपर आहे – यादवांच्या भाषेत 'निवेदनशील कथा' आहे – हे उघड आहे. त्याचप्रमाणे यादवांची कथा दर्शनप्रधान आहे – यादवांच्या भाषेत 'आविष्कारशील कथा' आहे – हेही स्पष्ट आहे. माडगूळकरांच्या उणिवा स्पष्ट होतील व स्वतःची बलस्थाने प्रकट होतील अशाच उदाहरणांचे विश्लेषण व चर्चा यादव करतात. त्यांचा प्रतिवाद करताना गो. मा. पवार माडगूळकरांची बलस्थाने व यादवांच्या उणिवा स्पष्ट होतील अशाच उदाहरणांचे विश्लेषण व चर्चा करतात. यादवांनी माडगूळकरांना केलेला विरोध आणि पवारांनी माडगूळकरांचा घेतलेला कैवार यामागे वाङ्मयीन मतभेदांपेक्षा इतर काही असावे अशी शंका त्यामुळे येऊ लागते. याचे कारण असे की, अशी सुटी व एकांगी उदाहरणे निवडून कोणाचाच मुद्दा सिद्ध होत नाही. त्यासाठी समग्राचा अनेकांगी तौलनिक विचार करावा लागतो. केवळ कोणती निवेदनपद्धती वापरली एवढ्यावरून ते ठरत नाही. ही निवेदन पद्धती कोणती आहे यापेक्षा ती कशी वापरली, त्यातून लेखकाने काय साधले हे पहावे लागते. या दिशेने अधिक विचार करण्याची जागा अर्थातच ही नाही.

माडगूळकरांच्या तृतीयपुरुषी निवेदनाची यादवांनी जी मीमांसा केली आहे तीही न पटण्यासारखी आहे. व्यंकटेश माडगूळकरांनी श्री. म. माटे यांची विश्वस्ताची भूमिका जाणिवपूर्वक नव्हे तर काहीशा गतानुगतिक पद्धतीने स्वीकारली. माडगूळकरांचे तृतीयपुरुषी नागर निवेदन ग्रामीणांपेक्षा वेगळी मूल्ये स्वीकारल्याच्या सुप्त जाणिवेतून निर्माण झाले आहे. (स्वरूप ७/पृ. ८८–९३, संस्कृती ५/पृ. ४३–४५); ही यादवांची कारणमीमांसा न पटणारी आहे. याविषयी अधिक चर्चा करण्यापेक्षा आनंद यादवांचेच एक विधान पुढे करणे पुरेसे होईल. ते असे, "माट्यांचे विश्व लहान होते तरी ते अत्यंत कसदार आणि सखोल, मानवतेच्या स्पंदनाने जिवंत झालेले होते. म्हणूनच ग्रामीण कथेचे जनक त्यांना मानावे लागते. पुढे व्यंकटेश माडगूळकरांनी हेच अत्यंत मनःपूर्वकतेने, व्यापकतेने, सूक्ष्मतेने, सातत्याने केले." (स्वरूप १/ पृ. २९) माट्यांच्या कथेपेक्षा माडगूळकरांची कथा अधिक कलात्मक असल्याचा'निर्वाळाही यादवांनी तेथेच दिला आहे.

यादवांच्या विवेचनात असे पुष्कळच अधिक ऊणे असले तरी साहित्यातील बोलीच्या वापराविषयी त्यांनी जे प्रश्न उपस्थित केले आहेत त्यांना त्यांनी समर्पक उत्तरे दिली आहेत, हे मान्य करावे लागते.

### ०४. कलामाध्यम म्हणून बोलीच्या मर्यादा व विकासाच्या दिशा

बदलते ग्रामीण जीवन आणि त्यामुळे ग्रामीण साहित्यात वाढलेला ग्रामीण बोलींचा वापर हा आनंद यादवांच्या चिंतनाचा विषय आहे. इ. स. १९६५ ते १९७५ या काळात खेड्यातील सामाजिक परिस्थिती सुधारली.






शिक्षितांचे प्रमाण वाढले. महाविद्यालये, साखर कारखाने, सहकारी सोसायट्या, ग्रामपंचायती यात नोकऱ्या मिळाल्याने ग्रामीण समाजाशी या नवशिक्षितांचा संबंध कायम राहिला. पहिल्या पिढीपेक्षा या दुसऱ्या पिढीचा प्रमाणभाषा, नागर साहित्य व संस्कृती यांच्याशी प्रत्यक्ष संपर्क कमी आला. साहजिकच त्यांची प्रमाणभाषा नागर नोकरदारांपेक्षा वेगळी आणि ग्रामीण वळणाची बनली. त्यामुळे या पिढीतील साहित्यिकांनी आपल्या लेखनात ग्रामीण बोलीभाषेचा सहजपणे, मुक्तपणे व स्वाभाविक रीतीने वापर केला. नव्या युगाने ग्रामीण भाषेला दिलेली ही महत्त्वाची आणि अपूर्व देणगी आहे. (स्वरूप ८/ ९८, १०१, १०४)

अशा वेळी ग्रामीण बोलीभाषेच्या काही मर्यादा लेखक म्हणून जाणवू लागतात. ग्रामीण भाषा ही गावातल्या प्राथमिक पातळीवरच्या साध्यासुध्या जीवनाची भाषा आहे. साहजिकच तरल, जटिल आणि वास्तवापासून काहीशा वेगळ्या अशा जाणिवांचा आविष्कार करताना लेखकाला तिच्या मर्यादा जाणवतात. ग्रामीण कविता असो की आणखी काही त्याना लेखनाला प्राप्त शब्दसंपदेवरच गुजराण करावी लागते. या भाषेला व्याकरण असले तरी व्याकरण, भाषाविज्ञान, व्युत्पत्ती यांच्या आधाराने नवे शब्द घडविता येत नाहीत. शब्द रूढ होऊन वापरला गेला तरच तो 'बोली'चा भाग होतो. एखादा शब्द घडविला तरी त्याला 'बोली' पण प्राप्त झालेले नसल्याने तो वापरणे अनुचित ठरते. नवशब्दनिर्मिती हा नागर लेखनात कौतुकाचा भाग ठरतो. ग्रामीण लेखनात मात्र त्यामुळे अनौचित्य निर्माण होते. रूढ शब्दसामग्रीची मर्यादा ही ग्रामीण साहित्याला स्वीकारावी लागते. (स्वरूप ८/९९-१००) साहित्याचे माध्यम म्हणून ग्रामीण बोलीची ही मर्यादा नोंदविण्यात यादवांनी आपल्या भाषिक संवेदनशीलतेचा आणि साहित्यनिर्मितीच्या अनुभवाचा प्रत्यय दिला आहे. त्यांची समीक्षा ही एका 'पोएट-क्रिटिक'ची समीक्षा आहे, हे अशा वेळी ठळक होते.

बोलीने प्रमाण भाषेला वेळोवेळी भाषिक खुराक पुरविलेला आहे. आता प्रमाण भाषेने बोलीला असा भाषिक खुराक पुरविला तर ग्रामीण मनाचा आविष्कार साहित्यातून करण्यास साहाय्यच होईल; असा अभिनव विचार त्यांनी मांडला आहे. आजच्या पिढीच्या ग्रामीण बोलीवर नागर भाषेचेही संस्करण आहे. त्यामुळे त्यांच्या साहित्यात नवे शब्द, शब्दप्रयोग, अलंकारांचा वापर, काव्यात्म आविष्कार दिसतो. ग्रामीण जीवनाची पातळी उंचावताना ही नागर संस्कारांनी विकसित झालेली ग्रामीण बोली अधिक साहाय्यक ठरेल असे त्यांना वाटते. यासंबंधात ग्रामीण बोलीत मुरून जातील असेच नागर भाषेतील शब्द, शब्दरूपे, शब्दप्रयोग, वाक्यरचना आणणे औचित्याला धरून होईल. त्यांचा अतिरेक झाला तर ग्रामीण बोलीचा पोत आणि कस बिघडण्याची शक्यता आहे, असा इशाराही त्यांनी दिलेला आहे. एकूण ग्रामीण भाषेवर नागर भाषेचे संस्कार सूक्ष्मतः करीत राहणे व त्याद्वारे ग्रामीण बोलीचा माध्यम या नात्याने विकास करणे जोखमीचे काम आहे; असा निर्वाळा त्यांनी दिलेला आहे. त्याचप्रमाणे भाषाविकासाला हातभार लावण्याचे श्रेयही इ. स. १९६५ ते १९७५ या दशकातील ग्रामीण साहित्यिकांना दिले आहे. (स्वरूप ८/ पृ. १०१, १०४, १०५)

ग्रामीण बोली सर्जनशील साहित्याचे माध्यम म्हणून वापरताना तिच्या कोणत्या मर्यादा जाणवतात याचे नेमके विवेचन यादवांनी केले आहे. ग्रामीण बोलीत नवशब्दनिर्मितीची प्रक्रिया घडत नाही, घडविता येत नाही; असे जे यादव म्हणतात ते तपासून पहावे लागेल. याचा दुसरा अर्थ असा होतो की ग्रामीण बोलीचा कोणताही विकास आजपर्यंत झालेला नाही, भाषेचा स्वभाव लक्षात घेता असे होणे संभाव्य वाटत नाही. "साहित्यनिर्मितीची गरज म्हणून नवे ग्रामीण शब्द कधी आलेच नाहीत किंवा घडलेही नाहीत ......... लिखित स्वरूपात ग्रामीण साहित्य ही घटना प्रथमच ग्रामीण भाषेत, देशाच्या सांस्कृतिक इतिहासात घडत आहे." (स्वरूप ८/पृ. १०१) ही यादवांची विधाने अनैतिहासिक आहेत. म्हाइंभट्ट, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम यासारख्या मध्ययुगीन साहित्यिकांनी ग्रामीण बोलीचे सत्त्व शोषूनच कसदार साहित्यनिर्मिती केली. त्यामुळे शेतारानात राबणाऱ्या निरक्षर कष्टकऱ्यांनी त्यांचे साहित्य सातशे वर्षे आपल्या जिभेवर घोळत ठेवले; हे कसे विसरता येईल?

ग्रामीण बोलीला समृद्ध करण्याचे कार्य यादवांच्या

अनुक्रमणिका






पिढीतील लेखकांनी केले ते माडगूळकरांच्या पिढीने केले नाही (स्वरूप ८/पृ. १०१-१०३, १०४-१०५) असा जो सूर यादवांनी लावला आहे तोही बरोबर नाही. व्यंकटेश माडगूळकरांनी ब्राह्मण-मराठ्यांपासून स्पृश्यास्पृश्यांपर्यंतच्या सगळ्या जातीपातीतील स्त्री-पुरुषांची भाषा संवादासाठी चांगल्या प्रकाराने उपयोगात आणली. त्यांचे नागर निवेदनही बोलीतील मार्मिक शब्दांच्या वापराने ग्रामीणतेला उठाव देणारे आहे. गो. मा. पवार म्हणतात, "केवळ साहित्यिक प्रमाण मराठी भाषेचा सराव असणाऱ्या वाचकांना ग्रामीण बोलींचा क्रमशः परिचय करून देऊन प्रमाण साहित्यिक भाषा व ग्रामीण बोली यांच्यामध्ये पूल बांधण्याचे महत्त्वाचे कार्य केले व साहित्यिक भाषेला बोलीकडे उन्मुख केले."[०६] हे माडगूळकरांचे श्रेय नाकारता येणारे नाही.

## ०५. बोलींचे भवितव्य

विवेचनाच्या ओघात समकालीन वाङ्मयव्यवहारातील शंका-कुशंका, प्रश्न-आक्षेप यांचाही यादव परामर्श घेतात. भविष्यात खेड्यांचे उपनगरात रूपांतर होईल. ग्रामीण जीवनाबरोबर ग्रामीण बोली नाहीशी होईल. असे झाले तर ग्रामीण साहित्याला व बोलीला काही भवितव्य आहे काय? — हा एक असाच प्रश्न.

असे होणार नाही; असे एक उत्तर यादवांनी दिलेले आहे. शहरकेंद्री मनोवृत्तीतून उपस्थित केलेला हा प्रश्न त्यांना फसवा वाटतो. शिक्षित माणूस शहरवासी झाल्यावर त्याची ग्रामीण बोली नाहीशी होऊन तो नागर बोलू लागतो; या पहिल्या पिढीच्या अनुभवावर हा प्रश्न आधारलेला आहे. आता शिक्षित माणूस ग्रामातच राहतो म्हणून त्याचा ग्रामवास आणि ग्रामीण बोली कायम राहील. अर्थात कोणत्याही भाषेप्रमाणे तिच्यात अंतर्गत परिवर्तने होत राहतील.

कितीही सुधारली तरी खेडी कृषिप्रधानच राहतील. परिवर्तने झाली तरी ग्रामीण जीवन म्हणजे नागर जीवनाचा छोटा नमुना असे होणार नाही. आजकालचे काही नष्ट झाले तरी उद्याचे नवे ग्रामीण जीवन, नव्या समजुती, नवी सामाजिक परिस्थिती असेल. त्यातील तणाव नव्या ग्रामीण साहित्यात येतील.

प्रश्नामध्ये अभिप्रेत आहे तसे झाले तरी त्याचा अपेक्षित परिणाम होणार नाही; असे दुसरे उत्तर यादवांनी दिलेले आहे. बदल झाला तरी भविष्यकाळात भूतकालीन बोलींचा नमुना म्हणून ग्रामीण साहित्याकडे एक सांस्कृतिक ठेवा म्हणून पाहिले जाईल. यापुढे जाऊन ते म्हणतात साहित्यगत जीवन व भाषा यांना वर्तमानात अस्तित्व नसले तरी ते व्यक्त करणाऱ्या साहित्याचे मूल्य कमी होत नाही. पौराणिक, ऐतिहासिक वळणाचे साहित्य, प्राचीन संस्कृत व मध्ययुगीन मराठी साहित्य यासारखी उदाहरणे यादवांच्या सिद्धांताला पुष्टी देणारी आहेत. (स्वरूप ८/पृ. १०६-१०७)

## ०६. बोलींचा वाङ्मयीन प्रवास

ग्रामीण बोली मराठीच्या ग्रांथिक व्यवहारात केव्हा व कोणत्या प्रकाराने वापरली गेली; तिची वळणे-वाकणे, तिचे टप्पे यांचा एक ऐतिहासिक आलेख काढण्याचा आनंद यादव यांनी प्रयत्न केला आहे. बदलती सामाजिक परिस्थिती आणि त्या त्या वेळचे वाङ्मयीन वातावरण या दोन्हींचा संदर्भ जागता ठेवून त्यांनी बोलींचा वाङ्मयीन प्रवास अधोरेखित केला आहे.

महात्मा जोतिबा फुले (इ. स. १८२७ ते १८९०) यांच्या ग्रंथाचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने विष्णुशास्त्री चिपळूणकर (इ. स. १८५० ते १८८२) यांनी इ. स. १८७७ मध्ये फुल्यांच्या विचारविश्वावर आणि ग्रंथभाषेवर टीकेची झोड उठविली. फुले यांच्या भाषेवर इंग्रजीचा व मिशनरी मराठीचा काही प्रभाव असला तरी मूलतः ती ब्राह्मणेतरांची, बहुजनांची व ग्रामीणांची भाषा होती. बहुजनांच्या देशी बोलीने ग्रंथरूप धारण करताच ग्रंथगत प्रमाणभाषेच्या क्षेत्रातून तिच्यावर झालेला हा पहिला हल्ला मानावा लागतो. अभिजनसंस्कृती आणि बहुजनसंस्कृती, ब्राह्मणी आणि अब्राह्मणी, शुद्धतावादी आणि तथाकथित अशुद्ध बोलणारे यांच्यामधला हा संग्राम असल्याचे दिसते. प्रमाणभाषेच्या अभिजनांनी ग्रामीण भाषेविषयी दाखविलेला पूर्ण अविश्वास त्यांच्या या विरोधी वृत्तीतून स्पष्ट जाणवतो. हा मुद्दा मांडताना म. फुले व वि. कृ. चिपळूणकर यांच्या व्यक्तिमत्त्वातील विरोध, त्यांच्या भाषिक घडणीचा काळ, त्यांच्याभोवतालची सामाजिक, वाङ्मयीन व सांस्कृतिक परिस्थिती या

सर्वांची सूक्ष्म व चिकित्सक मीमांसा यादवांनी केलेली आहे ती मोठी उद्‌बोधक आहे. प्रमाण मराठीची घडण होताना अशा काही चुका झाल्या की प्रमाण भाषा व मराठी बोली यांच्यात एक मानसिक दरी निर्माण झाली; इकडेही त्यांनी लक्ष वेधले आहे. (संस्कृती ५/पृ. ३४--३९). या सगळ्याचा परिणाम म्हणून ग्रांथिक परंपरेत बोलीला विरोध झाला. तिच्यावर अविश्वास दाखवून तिची हेटाळणी करण्यात आली हा ग्रामीण बोलीच्या वाङ्‌मयीन प्रवासाचा पहिला टप्पा म्हणावा लागतो.

हरी नारायण आपटे यांच्या "काळ तर मोठा कठीण आला" (इ. स. १८९७), धनुर्धारी यांच्या "पिराजी पाटील" (इ. स. १९०३) या साहित्यकृतींतील ग्रामीण पात्रांच्या तोंडी नागरभाषच वापरलेली दिसते.

इ. स. १९२५ व पुढेही काही काळ नाटकातील गावंढळ विनोदी पात्रांच्या तोंडी ग्रामीण बोली वापरलेली दिसते. ग्रामीण भाग, तेथील लोंक व त्यांची बोली यांचा टिंगल-टवाळीसाठी होणारा वापर हा बोलीच्या वाङ्‌मयीन प्रवासातील दुसरा टप्पा म्हणावा लागतो.

गांधीयुगात खेडे, तेथील लोक व त्यांची बोली याकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलू लागला. त्यामुळे इ. स. १९२५ नंतर कथा, कादंबरी, जानपद कविता यात ग्रामीण बोली गांभीर्याने वापरली गेल्याचे दिसते. यशवंत, गिरीश, ग. ल. ठोकळ यांची ग्रामीण बोलीकडे पाहण्याची वृत्ती तुच्छतादर्शक किंवा टवाळखोर नाही. गंभीर आहे. त्या जोडीला जानपद बोलीने कवितेच्या श्रवणीयतेला लज्जत येते. हे जाणून 'फॅशन' म्हणून ती वापरण्याची पद्धत आली. तीत अंतर्मुखतेपेक्षा बहिर्मुख उत्साह मोठा होता.

इ. स. १९२५-१९४० या तिसऱ्या टप्प्यातील लेखकांची भूमिका आपण ग्रामीण जीवन शहरी वाचकांना समजून सांगावे अशी होती. त्यासाठी त्यांनी ग्रामीण साहित्याच्या निवेदनाची भाषा नागर मराठी व पात्रांच्या तोंडची भाषा ग्रामीण बोली अशी द्विस्तरीय व्यवस्था ठेवल्याचे दिसते. (संस्कृती पा. पृ. ३९-४०).

यात मनःपूर्वकता, सखोलता व गांभीर्य आले ते कथाकार, श्री. म. माटे आणि कादंबरीकार र. वा. दिघे यांच्या लेखनात. माटे साताऱ्याकडच्या ग्रामीण भागात, पुण्यामुंबईबाहेर वाढले. महार, मांग, रामोशी, भराडी, चांभार अशा उपेक्षित समाजघटकांशी त्यांचा जवळून परिचय होता. त्यांच्यासाठी काही काम त्यांनी दीर्घकाळ केले. समग्र मराठी समाजाविषयी त्यांनी समाजशास्त्रीय चिंतन केलेले होते. त्यामुळे त्यांच्या नागरभाषेत अनेक प्रादेशिक छटा मिसळलेल्या होत्या. मार्मिक ग्रामीण शब्द माटे निर्भीडपणाने आपल्या प्रमाणभाषेत वापरीत व त्या शैलीने लिहीत. समाजाच्या विविध क्षेत्रात विखुरलेल्या बलुतेदारांनी, विविध जातीजमातींनी आपल्या भाषेत लिहिले तर मराठी भाषा समृद्ध होईल; अशी 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' त्यांनी मांडली. श्री. म. माटे यांची ही भूमिका विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या भूमिकेच्या नेमकी विरोधी होती.

र. वा. दिघे वकील असले तरी खेड्यात रहात. शेती करीत. थॉमस हार्डीसारखा ग्रामीण लेखक त्यांचा आवडता होता. गांधीवाद त्यांना मान्य होता. त्यांची प्रमाणभाषा ग्रामीण भाषेतील अनेक शब्दप्रयोगांनी व रचनावैशिष्ट्यांनी संस्कारित झालेली होती. या भाषेतच त्यांनी आपल्या ग्रामीण कादंबऱ्यांचे निवेदन केले आणि संवाद खास ग्रामीण बोलीतून लिहिले.

नागर व ग्रामीण यांच्या सरमिसळीतून जी नवी प्रमाणभाषा घडू पाहत आहे; त्याचे दोन नमुने म्हणून माटे-दिघे यांच्या लेखनशैलीकडे यादव पाहतात. इ. स. १९४० ते १९६० पर्यंत या दोन मातब्बर लेखकांनी ग्रामीण जीवनाच्या विश्वस्ताची (ट्रस्टीची) महत्त्वपूर्ण भूमिका बजावली. त्यामुळे ग्रामीण साहित्य अधिक वास्तवदर्शी झाले. निवेदनातील नागर व संवादातील ग्रामीण यात जो दुरावा होता तो या दोघांच्या लेखनात नाहीसा झाला. त्यात एक संवादी नाते व विश्वासपूर्ण जवळीक निर्माण झाली. (संस्कृती ५/पृ. ४१-४३).

हीच विश्वस्ताची भूमिका काहीशा गतानुगतीक वृत्तीने श्री. ना. पेंडसे, गो. नी. दांडेकर, व्यंकटेश माडगूळकर, म. म. कर्णिक, हमीद दलवाई, चि. त्र्यं. खानोलकर, जयवंत दळवी, वि. शं. पारगावकर यांच्या लेखनात दिसते. 'मूळ गावाकडचा पण नंतर शेरगावचा झाल्याच्या' अवस्थांतरातून त्यांच्या लेखनात उच्चवर्गीय मूल्यदृष्टी आल्याचे दिसते. ते उच्च पातळीवरून ग्रामीण जीवनाकडे

पाहतात आणि नागर वाचकांना ते समजावून देण्याची भूमिका घेतात. (संस्कृती ५/ पृ. ४३-४५)

आतापर्यंतच्या प्रवासामुळे नागर वाचकांना संवादांमुळे बोलींचा परिचय होत गेला. संवादातील बोली वेगळेपणामुळे, चैतन्यरूपांमुळे, जिवंतपणामुळे वाङ्मयापुरती अधिक रोचक व हवीहवीशी वाटू लागली. त्यामुळे शंकर पाटील, उद्धव शेळके, मनोहर तल्हार, चंद्रकुमार नलगे यांच्या लेखनात बोलीतील संवादांचे प्रमाण वाढले. निवेदनातील नागर भाषेवर ग्रामीणतेचे अधिक संस्कार होऊ लागले. निवेदक ग्रामीणतेला अधिक जवळ आला. लेखकाची विश्वस्ताची भूमिका निष्प्रभ होऊ लागली. हा पाचवा टप्पा. (संस्कृती ५/पृ. ४६).

सहाव्या टप्प्यावर ग्रामीण जीवन सच्च्या ग्रामीण रूपात रेखण्याच्या प्रेरणेतून आनंद यादवांनी अस्सल ग्रामीण बोली संवादासह निवेदनासाठीही वापरली. सत्यकथेने निर्माण केलेल्या कलाविषयक जाणिवा आणि स्वातंत्र्यानंतर ग्रामीणत्वाचा न्यूनगंड कमी होऊन आलेला आत्मविश्वास त्यामागे होता. आनंद यादव, रा. रं. बोराडे, महादेव मोरे हे स्वतः ग्रामीण जीवनाचा भाग होते. त्यामुळे मध्यस्थाच्या किंवा विश्वस्ताच्या भूमिकेचा येथे प्रश्नच नव्हता. याचा परिणाम म्हणून ग्रामीण साहित्य अंतर्बाह्य बदलले. (संस्कृती ५/पृ. ४६-४७).

सातव्या टप्प्यावरच्या १९७५ नंतरच्या साहित्यिकांनी ग्रामीण साहित्याचे माध्यम म्हणून सरसकट ग्रामीण बोलीचा वापर मुक्तपणे व स्वाभाविकपणे करावयास आरंभ केला. ग्रामीण साहित्य ग्रामीण भाषेतच लिहावयाचे असते अशी त्यांची समजूत दिसते. 'कलात्मक साहित्याचे माध्यम' एवढ्याच मर्यादित दृष्टीने ग्रामीण बोलींकडे त्यांनी पाहिले नाही. पांढरपेशांची प्रमाणभाषा त्यांनी नाकारली. ग्रामीण व प्रमाणभाषा यांच्या परस्परसंस्कारांचे प्रमाण त्यांच्या लेखनात वाढले. (संस्कृती ५/पृ. ४८-४९).

इ. स. १८७७ पासून संपूर्ण अविश्वास, बहिष्कृत अवस्था व प्रतिकूल परिस्थितीला तोंड देत, वाङ्मयात चंचूप्रवेश मिळवत, वाङ्मयाचे स्वयंसिद्ध माध्यम व्हायला ग्रामीण बोलीला इ. स. १९८० पर्यंत शंभर वर्षांचा प्रदीर्घ व खडतर प्रवास करावा लागला. त्याची ऐतिहासिक अवस्थांतरे टिपीत, ग्रामीण बोलीच्या उज्ज्वल भवितव्याविषयी आशावाद प्रकट करीत, यादव आपले विवेचन आटोपते घेतात (संस्कृती ५/पृ. ५०)

ग्रामीण बोलीचा मराठी वाङ्मयात कसकसा वापर होत गेला; त्यामागे कोणत्या वृत्ती होत्या, कोणता सामाजिक संदर्भ होता याविषयीचा अभ्यासपूर्ण आलेख यादवांनी येथे काढला आहे. तो पुष्कळ प्रमाणात स्वीकार्य असा आहे. त्यातील व्यंकटेश माडगूळकर व त्यांची पिढी यावर त्यांनी जी टीका केली आहे तिची अयथार्थता मागे विशद केलेली आहेच.

यादवांनी बोली आणि वाङ्मय यांच्या संबंधांचा जो विचार केला आहे तो रूढ पद्धतीचे ग्रामीण साहित्य डोळ्यासमोर ठेवूनच. त्यामुळे भालचंद्र नेमाडे यांच्यासारख्या दमदार लेखकाचे साहित्य त्यांच्या नजरेतून निसटले आहे. नेमाड्यांच्या कादंबरीचा फलक खेड्यांपासून महानगरांपर्यंत पसरलेला आहे. पुणे, मुंबईपासून नगर, औरंगाबाद, धुळे, कोल्हापूर अशा वेगवेगळ्या भागातील आणि जातीजमातीतील माणसांच्या वैशिष्ट्यपूर्ण बोलीचे अस्सल दर्शन त्यांच्या लेखनातून घडते. हिंदूधर्मियांबरोबरच ख्रिश्चन, मुसलमान, पारशी अशा इतर धर्मियांची मराठीही त्यांनी साहित्यात वापरली. त्यामुळे मराठीचा व्याप कसा आणि किती पसरला आहे त्याचे भान येते. अनेक ग्रामीण लेखकांप्रमाणे अण्णा भाऊ साठे, बाबुराव बागूल, योगिराज वाघमारे अशा किती तरी दलित लेखकांनीही बोलीला प्रतिष्ठा दिली. हमीद दलवाई, ना. धों. महानोर, नामदेव ढसाळ यांचे कादंबरीलेखनही यादृष्टीने महत्त्वाचे आहे. मराठी ग्रामीण बोलपटांचे संवाद लिहिणारे किती तरी लेखक येथे अस्पर्शित राहिले आहेत. ग्रामीण साहित्य या संज्ञेचा मर्यादित अर्थ गृहीत धरल्याचा हा परिणाम दिसतो.

सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे मध्ययुगीन मराठी साहित्याच्या श्रीमंत माहेराकडे यादवांचे झालेले दुर्लक्ष. खेडोपाडी विखुरलेल्या आणि अनेक थरातून आलेल्या संतांची आणि शाहीरांची कविता लोकबोलीतून प्रकट होते. महानुभावांचे चरित्रलेखन विस्तृत प्रदेशातील मराठीचा व्याप-विस्तार कवेत घेणारे आहे. ग्रामीण बोलीच्या या समृद्ध वारशाशी ग्रामीण नवलेखकांनी आपले नाते जोडलेले नाही. ग्रामीण साहित्याच्या किरटेपणाचे हेही एक कारण

आहे. आनंद यादवांसारख्या ग्रामीण साहित्याच्या धुरिणांनी मध्ययुगीन ग्रामीण साहित्याकडे पाठ फिरविली या वस्तुस्थितीकडेही त्याचा काही वाटा जातो.

**०७. प्रमाणभाषा, बोली आणि संस्कृती**

यातून प्रमाणभाषा, बोली आणि संस्कृती यांच्या बदलत्या संबंधांविषयीचा मुद्दा उद्‌भूत होतो. ग्रामीण व दलित साहित्याच्या निमित्ताने अनेकानेक बोलींचा लोंढा प्रमाण मराठीला मिळाला. मूळची ब्राह्मणी वळणाची प्रमाण मराठी भाषा हळूहळू निष्प्रभ ठरून बहुजनी वळणाची एक नवी प्रमाण भाषा महाराष्ट्रभर आकाराला येऊ लागल्याचे यादवांना दिसते (संस्कृती ५/पृ. ५०). त्यातून प्रमाण भाषा व बोली यांची ते सामाजिक अंगांनी मीमांसा करतात (संस्कृती ६/पृ. ५१-६५).

भाषा आणि बोली यांचे स्वरूप आणि संबंध याविषयी आनंद यादव यांना जे अभिप्रेत आहे ते अधिक नेमकेपणाने आपल्याला असे सांगता येईल– "बोलींच्या पलीकडे असे भाषेला अस्तित्व नसते. संबद्ध बोलींचा समूह म्हणजेच भाषा होय. निरनिराळ्या वर्गीय आणि स्थानिक बोलींचा परस्परसंबद्ध, कमी–अधिक आकलनक्षम आणि अस्तित्वापुरती भिन्नता राखणाऱ्या बोलींच्या समूहाला आपण मराठी म्हणत असतो. मराठी हे अशाप्रकारे तिच्यात अंतर्भूत होणाऱ्या बोलींचे समूहवाचक व कल्पनावाचक नाव आहे. महाराष्ट्रात बोलल्या जाणाऱ्या परस्परनिकट अशा अनेक बोलींचे ते समावेशक नाव आहे."[०७] भाषेची ही व्यापक संकल्पना आणि बोलींची समान योग्यता या दोन तत्त्वांचा आधार घेऊन यादवांनी प्रचलित प्रमाण भाषा, बोली व संस्कृती यांची पुर्नमांडणी करणारा महत्त्वपूर्ण विचार मांडला आहे.

आपली प्रमाण मराठी ही कोणतीही मराठी बोलणाऱ्या माणसाला जवळची वाटणे आवश्यक असते. आजची प्रमाण मराठी तशी नाही. याविषयीचे असमाधान यादवांनी वेगवेगळ्या ठिकाणी व्यक्त केले आहे. 'महाराष्ट्र भाषेचा कोश' भाग (इ. स. १८२९) आणि मोल्सवर्थचा 'रस्त्यावर खेळणाऱ्या मुलाचे तोंडचे शब्दसुद्धा' घेतल्याचा दावा करणारा मराठी–इंग्रजी कोश (इ. स. १९३१) यांची धारणा "महाराष्ट्रभाषा म्हणजे महाराष्ट्रदेशी राहणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलावयाची प्राकृत भाषा" अशी होती. "…. देशभाषांच्या वर्तनाचा असा नियम आहे की, स्वस्वदेशाचे मध्यभागी शुद्धरूपाने असावे आणि उत्तरोत्तर पर्यंत भागी तत्तदेशांतरस्थ भाषांचे मिश्रणाने संकीर्ण रूपाने असावे. महाराष्ट्र देशाचा मध्यभाग म्हटला असता, प्रायः पुणे प्रांत होतो." अशीही त्यांची भूमिका होती. प्रत्यक्षात मुंबई–पुण्यामध्ये स्थलांतरित झालेल्या तत्कालीन कोकणस्थ ब्राह्मणांची बोली ही संकीर्ण, अशुद्ध व अप्रमाण मानून प्रचलित प्रमाण मराठी घडविली गेली. कोश, व्याकरण, पाठ्यपुस्तके यांच्या आधाराने मेजर कँडीच्या नेतृत्वाने व ब्राह्मण पंडितांच्या सहकार्याने घडलेली ही प्रमाण मराठी आहे.

खरे तर या प्रक्रियेत ब्राह्मण पंडितांबरोबर इतरांचेही सहकार्य घ्यावयास हवे होते. भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या पुण्याऐवजी मराठवाड्याचा एखादा भाग मध्यवर्ती मानावयास हवा होता. लोकजीवनातील भाषेला व्याकरण, कोश व पाठ्यपुस्तके यात सामावून घ्यायला हवे होते. या चुकांनी प्रमाण मराठी व इतर मराठी बोली यांच्यात संबंध राहिला नाही. मोठी मानसिक दरी निर्माण झाली आणि सांस्कृतिक संघर्षाची बीजे पेरली गेली. (संस्कृती ५/पृ. ३५–३८ आणि ६/पृ. ५३–५४).

ही प्रमाण भाषा एकप्रकारे शोषणाचे हत्यार बनली. न्यूनगंडाने पछाडलेले, भिन्न जाती व परिसरातून आलेले तरुण शिक्षित होण्यासाठी आपली बोली सोडून तथाकथित प्रमाण भाषा कष्टपूर्वक आत्मसात करतात. प्रमाणतेचा आग्रह धरला जातो. उच्चारणाचा सूर, हेल यामुळे येत असूनही हुषार मुले वर्गात गप्प बसतात. प्रमाण लेखनाच्या कसोटीवर त्यांना परीक्षेत कमी गुण दिले जातात. एखादा उमेदवार नोकरीत नाकारला जातो. मते किंवा ज्ञान हे बोलीतून व्यक्त झाल्यामुळे हास्यास्पद ठरविणे हा भाषिक जुलूम आहे. सामान्य माणसाची बोली रक्तातल्या पेशीसारखी त्याच्या जीवनाचा भाग असते. निरनिराळ्या निमित्तांनी त्याला ती मोडायला लावणे म्हणजे सामाजिक संघर्षाला आमंत्रण देण्यासारखे असते. (संस्कृती ६/पृ. ५८–६१).

स्वातंत्र्योत्तर काळात लोकशाही आणि शिक्षण प्रसार यामुळे उपेक्षित समाजघटकात आज जागृती आली आहे. आजचा राज्यकर्तावर्ग ग्रामीण बहुजनसमाजातून आलेला

आहे. त्याच्या भाषेचा प्रभाव समाजावर पडत आहे. मराठीच्या निरनिराळ्या बोलीतून होणाऱ्या साहित्यनिर्मितीला वेग आलेला आहे. हे उपेक्षित पण आता जागृत, प्रगत व शिक्षित असे समाजघटक प्राध्यापक, शिक्षक, डॉक्टर, इंजिनियर, वकील, अशा पांढरपेशा व्यवसायातही प्रविष्ट झाले आहेत. हे सारे आपल्या बोलीच्या अनेक अर्थच्छटा, ध्वनीच्छटा, शब्द, वाक्प्रयोग, म्हणी, वाक्यरचनेचे विशेष आणि बोलीचा स्वभाव प्रमाणभाषेला नेऊन भिडवीत आहेत. तिला प्रादेशिक रंगाने रंगवीत आहेत. (संस्कृती ६/पृ. ५४, ५७, ६०, ६१).

बोलींविषयीची घृणा आणि तुच्छता सोडून या प्रक्रियेचे भाषिक पातळीवर सामाजिक एकात्मतेच्या भावनेने आपण स्वागत केले पाहिजे. एखाद्या समाजाला त्याची भाषा सर्व क्षेत्रात सन्मानपूर्वक वापरू दिली तर तो समाज सर्वांगांनी फुलून येण्यास साहाय्यच होईल. मराठीच्या बोली समजून घेणे, म्हणजे व्यापक अर्थाने आपली मराठी मातृभाषाच समजून घेणे होय. या प्रक्रियेने मराठी भाषेचा पूर्णावतार दृष्टिपथात येईल. बोलीतील नादांचे हेलकावे, नवनव्या भाषिक लकबी, भावव्यक्तिकरणाच्या वेगवेगळ्या पद्धती यांचे आकलन होऊन मोहोरल्यासारखे होईल. ग्रामीण साहित्यिकांनी बोलीची गावरान रूपे अस्मितापूर्वक जपली आहेत. त्यामुळे आज बोलींना नवी जाग, नवी उभारी आली आहे. (संस्कृती ६/ पृ. ५५, ५६, ५७). निरनिराळ्या कारणांनी, वेगवेगळ्या बोली बोलणारे लोक आज एकत्र येत आहेत. त्यातून स्वतःची बोली, इतरांच्या वेगवेगळ्या बोली आणि प्रमाण भाषा यांच्या सरमिसळीतून नवी मराठी भाषा घडू लागली आहे. (संस्कृती ६/पृ. ६१).

भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. समाजाबरोबर भाषा बदलली नाही तर ती जाचक, कालबाह्य व निरुपयोगी ठरेल. अशा परिस्थितीत नव्याने येऊ घातलेल्या भाषारूपांची टिंगल करणे, उपहास-उपरोध करणे, हेटाळणी करणे आणि प्रस्थापित प्रमाणभाषेच्या रूपाला चिकटून बसण्याचा दुराग्रह धरणे अयोग्य आहे. (संस्कृती ६/पृ. ५४).

प्रमाणभाषा बदलत्या परिस्थितीनुसार बदलली पाहिजे; हे धोरण स्वीकारून बदलाचा आरंभ स्वतःपासून केला पाहिजे; यासाठी यादवांनी काही विचारार्ह सूचना केलेल्या आहेत. त्या त्या प्रादेशिक संस्कृतींचा परिचय उत्तम तऱ्हेने करून देणारे प्राथमिक शिक्षण हे त्या त्या प्रादेशिक बोलीतूनच दिले पाहिजे. हायस्कूलपासून प्रमाण भाषेत शिकवावे. क्रमिक पुस्तकात पांढरपेशा, बुद्धिजीवी संस्कृतीचेच दर्शन घडते. त्यामुळे ग्रामीणांना स्वतःच्या जीवनाविषयी न्यूनगंड वाटू लागतो. यासाठी सर्व समाजाचे चित्र बोलींमधून मांडणारे लेखनही त्यात समाविष्ट करावे. विद्यार्थ्यांचे ज्ञान पहावे, त्याची लेखनपद्धती पाहू नये. बोलींचा गोडवा, वेगळेपण आणि महत्त्व विद्यार्थ्याला पटवून द्यावे. शिक्षक, प्राध्यापक, लेखक, संपादक-समीक्षक यांची शिबिरे घ्यावीत. त्यांच्यात ही नवी भाषाविषयक जाणीव निर्माण करावी. असे झाले तरच प्रमाणभाषा व बोली यांच्यात सख्खे नाते निर्माण होईल. अन्यथा त्या बोली आजच्यासारख्या सावत्र नात्यानेच वागविल्या जातील आणि संघर्षाच्या बीजांना खतपाणी मिळेल. (संस्कृती ६/६०, ६३, ६४, ६५).

यासाठी आजची आपली प्रमाणभाषा निर्भीडपणे कालबाह्य ठरविली पाहिजे. नवी समृद्ध समावेशक प्रमाणभाषा घडविली पाहिजे. पशु, पक्षी, झाडे, पिके यांची विविध नावे, निसर्गाच्या, ऋतूंच्या, पावसाच्या विविध छटा, शेतीसंस्कृतीचा सनातन तपशील हे अजून आपल्या प्रमाणभाषेला माहीतच नाहीत ते या प्रक्रियेमुळे परिचित होतील. उच्चारणातील गोडवा, त्यामुळे बदलणाऱ्या अर्थच्छटा परिचित होतील. त्या त्या प्रदेशातील संवेदनांचे आणि जाणिवांचे विश्व लाभल्याने आपली प्रमाणभाषा समृद्ध होईल. विविध प्रादेशिक संस्कृती व्यापक मराठी संस्कृतीशी एकात्म होण्यासाठी आणि सामाजिक एकता व समता निर्माण व्हायला मदतच होणार आहे. (संस्कृती, ६/पृ. ६२).

भविष्यात प्रमाणभाषा आणि बोली एकमेकींच्या गळ्यात गळे घालून वावरण्याचा काळ लांब नाही. प्रत्यक्षात नसले तरी मानसिक पातळीवर समाजाने समतेची भूमिका स्वीकारली आहे. साहित्यात याच मानसिकतेचा आविष्कार होत असतो. त्यामुळे उद्याच्या साहित्यातही समग्र समाज हेच केंद्र राहील. त्याची भाषा विविध बोलींच्या संस्कारांनी घडविलेली नवी प्रमाणभाषा असेल.

असा आशावाद यादवांनी इतरत्र व्यक्त केला आहे (संस्कृती ५/पृ. ५०).

'साहित्यातील प्रमाण भाषा व ग्रामीण भाषा' असे शीर्षक या लेखाला यादवांनी दिलेले आहे. तथापि त्याचा साहित्याशी तितकासा संबंध नाही. त्यातील विचार मुख्यतः प्रचलित प्रमाण मराठी आणि इतिहासाच्या ओघात बदलत गेलेल्या सामाजिक परिस्थितीने बोलींमध्ये व बोली बोलणाऱ्या समाजांमध्ये घडविलेले परिवर्तन हा आहे. या दोन्हींच्या संबंधांची ते चर्चा करतात.

अभ्यासासाठी एखादा विषय निवडणे आणि व्यासंगपूर्वक तो मांडणे हा यादवांच्या वैचारिक लेखनाचा स्वभाव नाही. असे पंडिती वळण ते टाळतात. त्यामुळे पुरेसे संदर्भ शोधून ते आपल्या विवेचनाला शास्त्राचे पाठबळ देत नाहीत. ना. गो. कालेलकरांच्या 'भाषा आणि संस्कृती' चा ते आधार घेतात तथापि त्यांच्याच 'भाषा : इतिहास आणि भूगोल'चा उल्लेखही करीत नाहीत. र. बा. मंचरकरांचे 'भाषाशास्त्रविचार' त्यांच्या नजरेतून निसटते. ग्रिअर्सनने केलेला मराठीच्या बोलींचा अभ्यास किंवा डेक्कन कॉलेजचा बोलींचा अभ्यासप्रकल्प त्यांच्या विवेचनात दुर्लक्षित राहतो.

आनंद यादव स्वतःला पडलेल्या प्रश्नांच्या उत्तरासाठी अभ्यास व विचार करतात. प्रत्यक्ष वस्तुस्थिती हाच त्यांच्या चिंतनाचा आरंभ असतो. त्यांचे लेखन विशिष्टाकडून सामान्याकडे जाणारे म्हणजे विगमनात्मक वळणाचे आहे. स्वानुभव आणि निरीक्षण यातून जाणवलेल्या वास्तवाचा अन्वयार्थ लावण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. त्यातून गवसलेले निष्कर्ष ते वाचकांसमोर ठेवतात. त्यामागे त्यांचा अनुभव असतो. चिंतन असते आणि विशिष्ट अशी भूमिकाही असते.

भाषेला स्वतंत्र व वेगळे अस्तित्व नसते. ती बोलींच्या रूपानेच अस्तित्वात असते. संबंधित अनेक बोलींचा समूह म्हणजे भाषा. ही भाषा ज्या समाजात बोलली जाते त्या समाजातील प्रभूवर्गाच्या बोलीला प्रामाण्य प्राप्त होते. सामाजिक उलाढालींनी या प्रभूवर्गाची जागा वेगळी बोली बोलणाऱ्या गटाने घेतली तर या नव्या प्रभूवर्गाची बोली प्रमाण भाषा बनू पाहते. मराठी भाषा व समाज यात गेल्या शे-सव्वाशे वर्षांत झालेल्या बदलांच्या आधाराने हे परिवर्तन यादव स्पष्ट करतात.

आनंद यादवांच्या या विचाराला भाषाविज्ञानाच्या काही तत्त्वांचा आधार आहे पण त्यांचा विचार केवळ भाषाविज्ञानाच्या कक्षेत राहणारा नाही. भाषिक बदलाची जी कारणमीमांसा ते करतात ती सामाजिक व ऐतिहासिक आहे. तिला जातिव्यवस्थेचा आणि जातीजातीतील संघर्षाचा पदर आहे.

खेड्यातून येऊन शहरात शिकणाऱ्या आणि स्थिरावणाऱ्या समकालीन पिढ्यांना ज्या अनुभवातून आणि अडचणींमधून जावे लागले त्यांचा ते वेध घेतात. त्याची तात्त्विक संगती लावतात. त्याच्या भविष्यकालीन परिणामांचा वेध घेतात. सावधगिरीचे इशारे देतात आणि अपेक्षित प्रक्रिया गतिशील व्हावी म्हणून कळकळीने विधायक सूचनाही करतात.

मराठी प्रमाणभाषेच्या घडणीवर त्यांनी घेतलेले आक्षेप किंवा दाखविलेल्या उणिवा रास्त आहेत. पण त्यांच्या कल्पनेतल्या नव्या प्रमाणभाषेचे स्वरूप कसे घडेल, कसे असेल ते नीटसे स्पष्ट होत नाही. अर्थात हे भाषावैज्ञानिकांचे काम आहे. यादवांचे काम मराठी भाषा बोली व समाज यात घडणारे परिवर्तन ठळकपणे लक्षात आणून देण्याचे आहे. ते त्यांनी चांगले केले आहे.

**०८. समारोप**

एक प्रतिभावंत लेखक म्हणून आनंद यादवांना ग्रामीण साहित्याचे माध्यम म्हणून ग्रामीण बोलीची अपरिहार्यता जाणवत होती. त्याविषयीच्या आक्षेपांचा परामर्श घेत त्यांनी कलामाध्यम म्हणून बोलींचा विचार केला. तिची आवश्यकता प्रतिपादन केली. माध्यम म्हणून तिच्या मर्यादा सांगितल्या आणि विकासाच्या दिशाही दाखविल्या. कलामाध्यम म्हणून तिचा वाङ्मयीन प्रवास कसकसा होत गेला ते न्याहाळले. तिच्या हेळणेत आपली समाजव्यवस्था हीही कार्यरत आहे हे उमगल्यावर व्यापक समाजजीवनातील बोलीची अवरूद्धता जाणवली आणि नव्या प्रमाणभाषेची गरज त्यांनी बोलून दाखविली.

साहित्यापासून सुरू झालेला हा बोलीविचार समाजापर्यंत जाऊन भिडतो. प्रमाणभाषा आणि बोली यांच्या साहित्यगत आणि समाजगत अशा बदलत्या संबंधांचे एक विचारप्रवृत्त करणारे निरीक्षण त्यांनी मांडले.

भाषेविषयी सजग असलेल्या एका लेखकाची ही निरीक्षणे आहेत. ती साहित्यसमीक्षा, साहित्यमीमांसा, भाषाविज्ञान, समाजशास्त्र आणि संस्कृतिमीमांसा यांच्या अभ्यासकांना खाद्य पुरविणारी आहेत.

आनंद यादव यांच्या भाषाविचाराला मर्ढेकरप्रभावीत समीक्षा आणि वाङ्मयीन वातावरण यांचा विशिष्ट कालसंदर्भ आहे. नववाङ्मयीन प्रवाहांच्या जन्मकाळातील अटीतटीच्या वादांचा आणि संगरांचा संदर्भ आहे.

बदलती परिस्थिती आणि सामाजिक संक्रमण यांच्याशी जोडलेल्या भाषिक स्थित्यंतराचा अन्वयार्थ लावताना यादव स्वानुभव व निरीक्षण यांचा आधार घेतात. अंदाज करतात. अनुमान करतात. त्यामुळे हे लेखन उलटसुलट विचार, कल्पना, आडाखे यांनी भरलेले आहे. त्याचे आशयद्रव्य सरकते, हलते, बदलते आहे. या सगळ्यांची वाङ्मयीन स्थित्यंतराशी सांगड घालण्याचा त्यांचा प्रयत्न आहे.

त्यांचा पिंड व्यासंगसमृद्ध शास्त्रीय लेखन करणारा पंडिती वळणाचा नाही. त्यामुळे ते सिद्धांत, तत्त्वे, संकल्पना, युक्तिवाद, कार्यकारण, तुलना, परिभाषा यांचा काटेकोर वापर करीत लिहीत नाहीत. ते कलावंत-समीक्षक (पोएटक्रिटिक) आहेत. अव्वल दर्जाचे कलावंत असल्याने कलानिर्मितिप्रक्रिया हा त्यांच्या कुतूहलाचा, अनुभवाचा, चिंतन-मननाचा विषय आहे. त्यातून त्यांना साहित्यतत्त्वांचे आकलन होते. त्याच पद्धतीने ते विधानांची मांडणी करतात.

त्यांच्या लेखनात स्फुरणशील आणि सर्जनशील विचारचिंतनाचा आढळ होतो. त्यात बारकावा आणि सूक्ष्मता येते. अनेक अंगोपांगांचा उलगडा होतो. साक्षात्कारी अभिनवतेचा प्रत्यय येतो.

यादवांच्या भाषाविवेचनाचा आरंभ कलावंत-समीक्षकाच्या भूमिकेतून होतो पण त्याचा शेवट मात्र सांस्कृतिक भाष्यकाराच्या भूमिकेजवळ होतो. बोलीचा प्रश्न हा केवळ साहित्याच्या माध्यमाचा प्रश्न नाही, केवळ व्याकरण-भाषाविज्ञानाचा प्रश्न नाही, तर तो सामाजिक - सांस्कृतिक प्रश्न आहे; या व्यापक जाणिवेजवळ येऊन ते थांबतात.

आनंद यादव यांचा भाषाविचार तर्क आणि शास्त्र यांच्या कसोटीवर घासला तर काय हाती काय येईल; ते निश्चित सांगता येत नाही. पण तरीही त्यात काही मौलिक विचारकण आहेत. कलानिर्मितीच्या वाटेने गवसलेली तथ्ये आणि सत्ये आहेत; एवढे नि:संशय.

**०९. संदर्भ आणि टीपा**

०१. गो. मा. पवार, 'साहित्यातील प्रादेशिकता : भाषा आणि निवेदन', शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथे एका परिसंवादात वाचलेल्या निबंधाची सायक्लोस्टाइल प्रत. पृ. ८.
०२. तत्रैव, पृ. ७.
०३. तत्रैव, पृ. ७.
०४. तत्रैव, पृ. ७.
०५. तत्रैव, पृ. ९, ११, १२.
०६. तत्रैव, पृ. ४.
०७. र. बा. मंचरकर, 'भाषाशास्त्रविचार', सौ. अंजली मेहता, युनिव्हर्सल प्रकाशन, कोल्हापूर, १९७५ पृ. १६१.

# 'तें०' – मरणोत्तर निरीक्षणे ......

डॉ. चंद्रशेखर बर्वे

'तें०' हे विजय तेंडुलकर यांचे (त्यांचे स्वतःचे परमप्रियही) अतिसंक्षिप्त लघुरूप. 'तें०' यांचे निधन दि. १९ मे २००८ रोजी पुण्यात (प्रयाग रुग्णालयात) झाले. त्यांच्या चाहत्यांना मनापासून गदगदा हलवून टाकणारी अशी ही घटना होती.

तेंडुलकर गेल्यावर, त्यांच्या चाहत्यांपैकी अनेकांनी, त्यांच्याविषयी बरेच भावपूर्ण असे लेख लिहिले. त्यात व्यक्तिगत आठवणी जागवणारे लेख सगळ्यांत जास्त होते, त्याखालोखाल, नाटककार (व पटकथाकार) म्हणून तेंडुलकरांची दखल घेणारे लेख होते; मात्र, एकूण साहित्यिक म्हणून तेंडुलकरांचा परामर्श घेणारे लेख अपवादानेच होते. या सर्व लेखांचा आढावा कोण्या तरुण, अभ्यासू लेखकाने घेतल्यास तो निश्चितच उपयुक्त ठरेल.

तूर्त, एका मर्यादित चौकटीत राहून, तेंडुलकरांच्या निधनानंतर प्रकाशित झालेल्या, दोन खूप महत्त्वाच्या पुस्तकांच्या आधारे, काही निरीक्षणे या छोटेखानी लेखात (खरे म्हणजे जरा विस्तृत टिपणात) नमूद करावी, असे योजिले आहे.

✡ पहिले पुस्तक – 'तें० नावाचे बाबा' – लेखिका – सुषमा तेंडुलकर (तेंडुलकरांची मोठी मुलगी).

✡ दुसरे पुस्तक – 'त्याची पाचवी' ('सखाराम बाइंडर' या तेंडुलकरांच्या नाटकाचा 'पूर्वांक') – भाषांतरकार – डॉ. चंद्रशेखर फणसळकर. तेंडुलकरांनी स्वतःच लिहिलेल्या 'His Fifth Woman' या इंग्रजी नाटकाचे मराठीतील भाषांतर म्हणजे 'त्याची पाचवी – ' हे पुस्तक.

या दोन पुस्तकांच्या संदर्भातील माझी निरीक्षणे अशी -

१. प्रथम, 'तें०' नावाचे बाबा, या पुस्तकाबाबत. "मनातलं सगळं कुणाला तरी भडभडून मोकळेपणानं, प्रांजळपणानं सांगत सुटावं .... तसं लेखिका लिहीत गेली ... ह्या सर्व हकीगतीतून तिनं 'तें०' नावाचे बाबा अचूक उभे केले आहेत." हे प्रकाशकीय प्रास्ताविक, आणि, "स्मशानभूमीतून (कोरडी) परत आल्यानंतर मी वेड्यासारखी बाबांच्या आठवणीत रंगले...... मी लिहायलाच बसले..... मी अजून लिहितेच आहे." हे लेखिकेचे प्रारंभीचे 'मनोगत' या दोन्ही बाबी लक्षात घेतल्या तरच सदर पुस्तकाचे आवेगी – उत्कट, विस्कळीत पण दळदार, चित्रगोचर स्वरूप ध्यानात येऊ शकेल.

हे पुस्तक तसे छोटेच आहे; पण त्यात उलगडलेला आठवणींचा पट बराच मोठा आहे. खुद्द तेंडुलकर – कुटुंबीय, तें० चे मित्र (मैत्रिणी – म्हणजे मित्रच), त्यांच्या जवळ आलेले साहित्यिक – नाटककार – कलावंत, इतर जिवाभावाचे सगळे यांत नोकरांबरोबर पाळीव प्राणीदेखील अशा अनेकांच्या आठवणी मिळून हा विस्तृत पट तयार झाला आहे.

अर्थातच, या पटावर ठसठशीतपणे उठून दिसतो तो तेंडुलकर व सुषमा यांच्यातील 'बाप-लेक' नात्याचा गुंतागुंतीचा, घट्ट, नाजूक, चिवट, देखणा गोफ – यातील धागे, त्यामधील पीळ, कोठेकोठे विसविशित – सैल, असे जरी असले, तरी तो गोफ मर्मदर्शी व भावस्पर्शी म्हणूनच हृदयस्पर्शीही आहे, हे खचित.

यामधून खुद्द तेंडुलकरांची जी प्रतिमा डोळ्यांसमोर उभी राहते ती विविधरूपी आहे – व्यक्ती, माणूस म्हणून, पुत्र, पती, पिता, आजोबा म्हणून, मित्र म्हणून, साहित्यिक, नाटककार, पटकथाकार, रंगकर्मी कार्यकर्ता म्हणून, छायाचित्रकार म्हणून, समाज-संस्कृती यांचा अभ्यासक, चिंतक म्हणून, अशा कितीतरी रूपांतले तेंडुलकर येथे दिसतात, त्यांच्या अनेक पैलूंची झलक कधी फिकट, कधी गडद अशी पाहायला मिळते. तुकड्या तुकड्यांतून तेंडुलकरांचे एक जिवंत, मानवी, रेखीव, लोभस 'पोर्ट्रेट' सुषमा आपल्यापुढे सहजोर्मीने सजीव करून जाते, हे तिचे फार मोठे यश म्हणावे/मानावेही

लागेल, हे निर्विवाद!

या पुस्तकातील आणखी एक विलोभनीय, पण चटका लावणारा भाग म्हणजे तेंडुलकरांनी सुषमाला लिहिलेली पत्रे. आयुष्यभर तेंडुलकर अनेक लढाया खेळले असले तरी आणि सुषमाने खेळलेल्या लढायांचे त्यांना कौतुक वाटले तरी, आयुष्याच्या अखेरीची चाहूल लागून आलेल्या कातरतेमुळे त्यांच्या या पत्रांत कारुण्य व गांभीर्य अधिक आहे आणि ते कमालीचे अस्वस्थ करणारे आहे. "काळ सर्वार्थाने आटायला लागला आहे. आयुष्य फार छोटे वाटते. त्याहून मी छोटा ...... परीक्षा कधी संपत नाहीत. शेवटची परीक्षा जगण्याच्या शाळेत असत नाही. असतो तो शेवट. अभ्यासक्रम अर्धाच सोडून जावे लागते....." असे तेंडुलकर लिहितात तेव्हा, वास्तवाला डोळा भिडवणाऱ्या तेंडुलकरांऐवजी पाणावलेल्या डोळ्यांनी वास्तव स्वीकारणारे तेंडुलकर दिसू लागतात; ताऱ्यांप्रमाणेच माणसाचेही शेवटी 'कृष्णविवर' होत जाते, हा तेंडुलकरांना गवसलेला नुसता जीवनार्थ नव्हे, तर जीवनार्क, ते शब्दांतून पकडतात तेव्हा, ते शब्द दाहक वाटण्याऐवजी करुणभावाने ओथंबून आलेले वाटतात.

'तें' नावाच्या बाबांचे असे दर्शन घडवणारे सुषमाचे हे पुस्तक आतपासून आतपर्यंत अगदी हेलावून टाकते.

२) आता, 'त्याची पाचवी-', या पुस्तकाच्या संदर्भातील काही मोजकी व शेलकी निरीक्षणे—

आरंभीच नमूद केले पाहिजे की येथे आपण तेंडुलकरविषयक, तेंडुलकरकेंद्री पुस्तकाकडून, दस्तुरखुद्द तेंडुलकरांच्याच पुस्तकापाशी, त्यांच्या अखेरच्या, त्याही इंग्रजीत लिहिलेल्या नाटकापाशी (नेमके म्हणावयाचे तर एका नाट्यांकापाशी), येतो—'His Fifth Woman' म्हणजेच मराठीत भाषांतरीत पुस्तक 'त्याची पाचवी—' (-भाषांतरकार- डॉ. चंद्रशेखर फणसळकर)

'सखाराम बाइंडर' (१९७२) हे तेंडुलकरांचे खळबळजनक नाटक. त्याचा 'पूर्वांक' किंवा प्रकाशकांनी म्हटल्याप्रमाणे 'पूर्वरंग' म्हणून तेंडुलकरांनी इंग्रजीत लिहिलेले नाटक म्हणजे 'His Fifth Woman'– 'त्याची पाचवी–' हे पुस्तक. याबाबतची निरीक्षणे नेटकेपणाने/ नेमकेपणाने नोंदवायची असतील तर अगोदर (मूळ व भाषांतर) या दोहोंची पूर्वपीठीका / पार्श्वभूमी माहीत असायला हवी.

सप्टेंबर २००४ मध्ये तेंडुलकरांच्या समग्र साहित्यावर अमेरिकेत न्यूयॉर्क येथे एक महिनाभर महोत्सव आयोजित करण्यात आला होता. त्यात 'His Fifth Woman'चे वाचन व प्रयोग दोन्ही प्रकारे सादरीकरण झाले. यासाठी तेंडुलकरांनी हस्तलिखित दिले; पण ते तयार होण्याआधी- होईपर्यंत तेंडुलकर त्याबद्दल साशंक होते; कारण, बऱ्याच वर्षात त्यांनी नाटक (तेही इंग्रजीत) लिहिले नव्हते मात्र 'लार्क' या अमेरिकन नाट्यसंस्थेच्या आर्जवी मागणीवरून, त्यांनी जे लिहून दिले ते, त्याचे दिग्दर्शक स्टर्गिस वॉर्नर यांनी म्हटल्याप्रमाणे, 'सखाराम बाइंडर' च्या मूळ नाट्यानुभवात 'Marvelous addition' ठरावी, असे आशयसंपन्न होते. ही झाली मूळ–इंग्रजीतील -नाटकाची पूर्वपीठिका/पार्श्वभूमी; आता भाषांतरित- मराठीतील-नाटकाची पूर्वपीठिका/पार्श्वभूमी बघू......

......तेंडुलकरांचे हे नवे नाटक मोहित टाकळकरना करायचे होते, त्यासाठी त्याचे मराठीकरण होणे आवश्यक होते; स्वतः तेंडुलकर बरेच आजारी व रुग्णालयात असल्यामुळे त्यांच्या हातून हे होणे अशक्यच होते, पण डॉ. चंद्रशेखर फणसळकरांनी हे काम पत्करले आणि तेंडुलकरांच्या, रुग्णशय्येवरूनच मिळालेल्या, अत्यल्प, तरीही बहुमोल मार्गदर्शनाच्या प्रकाशात ते पुरे केले. फणसळकरांनी 'प्रास्ताविका'त लिहिल्याप्रमाणे, "मूळ इंग्रजी नाटकातील तेंडुलकरांची भाषाच अतिशय 'ट्रान्स्लेटर फ्रेंडली' असल्यामुळे", फणसळकरांकडून हे काम विनासायास पार पडले. या पार्श्वभूमीवर आता आधी आपण 'त्याची पाचवी –'चे भाषांतर म्हणून निरीक्षण करू .....

.... तेंडुलकरांच्या मार्गदर्शनामुळे (फणसळकरी शब्दांत "वीस मिनिटांच्या कोचिंग सेशनमुळे") असो, किंवा, फणसळकरांच्या स्वयंस्फूर्त शब्दशक्तीमुळे असो, भाषांतर प्राणवान व परिणामसाधक, प्रभावी झाले आहे, हे प्रांजळपणे कबूल करायलाच हवे. परिणामासाठी – प्रभावासाठी भाषेत जो गावरान झणका किंवा रासवट शिवराळपणा, कलादृष्ट्या अत्यावश्यक अपरिहार्य होता,

अनुक्रमणिका

तो पुरेपूर आहे. जोरकस बोचऱ्या भाषेमुळे, ड्युरेन्मात्च्या 'डेंजरस गेम'पेक्षा तेंडुलकरांचे 'शांतता! कोर्ट चालू आहे' प्रखर परिणाम करून जाते, तसेच, तेंडुलकरांच्या 'हिज फिफ्थ वूमन' पेक्षा फणसळकरांचे (भाषांतरित) 'त्याची पाचवी –', त्याच्या उपरोक्त गुणयुक्त भाषेमुळे, विलक्षण रांगडा प्रभाव पाडून जाते. तेंडुलकर असते तर त्यांनीही यासाठी, फणसळकरांना मनापासून दाद व शाबासकीही दिली असती! .....

...... हे रास्त असले तरी, स्वतः फणसळकर 'भाषांतर' म्हणत नाहीत, 'स्वैर अनुवाद' म्हणतात, हे देखील सर्वस्वी अर्थपूर्ण आहे. कारण, एक तर, फणसळकरांनी मूळ भाषेचा केवळ वाच्यार्थ लक्षात न घेता, खोल भाव अर्थ ध्यानात घेतला आहे आणि (एक/दोन जागा.. वगळता) तो अचूक पकडला आहे. यामुळे, 'अनुवाद' – भावानुवाद - म्हणणे बरोबरच आहे. 'स्वैर अनुवाद' म्हणण्याचे कारण काय? कारण असे - - मुळातील दृश्य ३, ४ व ५ यांच्या बाबतीत फणसळकरांनी जरा जास्त स्वातंत्र्य घेतले आहे – कोठे मुळातील बऱ्याच (सुमारे २०/२५) ओळी गाळल्या आहेत (पृ. १५) कोठे मूळ तपशिलाचा संक्षेप केला आहे व क्रमही बदलला आहे (पृ. १६), कोठे मुळातील महत्त्वाचे शब्द गाळून त्यांचे भावसत्त्व सांभाळले आहे (पृ. २३), मुळातील – पाचव्या दृश्याची दीर्घसूचना दोन ओळींत वेगळ्या रीतीने दिली आहे (पृ. २८) – (कंसात दिलेली सर्व पृष्ठे 'त्याची पाचवी —' मधील). असे असले तरी मूळ स्मशानदृश्ये किंवा 'सखाराम बाइंडर'च्या या पूर्वांकाचा शेवट व मूळ 'सखाराम' नाटकाचा आरंभ यांच्या जोडणीजुळणीचा परिणाम लवमात्र उणावणार नाही, अशी दक्षता फणसळकरांनी चांगलीच घेतली आहे. यामुळेच, त्यांच्या भाषांतरात/अनुवादात स्वैरता असली तरी त्यात नाट्य भरकटलेले किंवा हरवलेले नाही, हे नक्की!

आतापर्यंत, आपण 'त्याची पाचवी —' चे, 'भाषांतर' म्हणून, निरीक्षण केले; आता, 'सखाराम —' चे, 'Prequel' म्हणून 'पूर्वरंग' किंवा 'पूर्वांक' म्हणून, निरीक्षण करू. अर्थातच हे अधिक अगत्याचे व महत्त्वाचेही आहे; कारण, याचा संबंध बहिरंगाशी नसून तो अंतरंगाशी गाभ्याशी आहे.

'सखाराम' चा 'पूर्वांक' समजण्यासाठी अगोदर, 'सखाराम' हे काय प्रकरण आहे, हे समजलेले असले पाहिजे. सखाराम हा एक बाइंडर, बेछूट मस्तवाल माणूस–लग्नाची बेडी कधीही घालून घेत नाही –. निराधार बाईला आसरा द्यायचा अन आपल्याला हवे ते तिच्याकडून हवे तसे वसूल करायचे हा त्याचा खाक्या- –सगळा खुला मामला—असा आसरा घेणारी लक्ष्मी ही सहावी बाई देवधर्म श्रद्धेने करणारी सखारामलाही ती आपल्यासारखे करायला लावते. लक्ष्मी हवे ते (शरीरसुख) भरभरून देत नाही आणि नको ते (देवधर्म) करवून घेते, याला सखाराम कंटाळतो. लक्ष्मीची जागा घेते चंपा. तिच्या धुंद शरीर सान्निध्याने तो नादावतो, पण आपल्यावर नकळत झालेल्या लक्ष्मीच्या संस्कारांतून तो मोकळा होऊ शकत नाही– परिणामी, चंपाच्या स्पर्शाचा आनंदही तो लुटू शकत नाही– तिलाही तो काहीच देऊ शकत नाही- भरीत भर, निरुपायाने लक्ष्मी परत येते– मग तर, सखाराम चंपाजवळ असतानादेखील, गर्भगळित होतो, पुरता गलितगात्र होतो– अनेक बाया खेळवणारा सखाराम, दोन बायांमुळे झालेल्या आपल्याच दोन अवस्थांच्या कात्रीत सापडून, हवा गेलेल्या रबरी खेळण्यासारख्या पोकळ, निर्बल होऊन पडतो– सखाराममधील मूळ सत्त्व शुष्क होते आणि त्याचा निर्जीव चोथा उरतो– आपण आपल्याला हरवून जात आहोत हे कळून चुकल्यावर, सखाराम सैरभैर होतो, धास्तावतो- अखेरीस त्याचे जिवंत मढे निर्जीव धिंगाणा घालून थंड पडते– सखारामचे अंतर्बाह्य उसळणे, घुसळणे, कोसळणे, कोळपणे यांत नाट्य आहे– सखारामच्या केविलवाण्या शेवटात, तेथपर्यंत होणाऱ्या त्याच्या खळाळत्या आंदोळत्या वळवळत्या, कळवळत्या उत्थान-पतनात त्या नाट्याची वेधकता व परिणामकारकता आहे– उद्दाम माणसाचा ताठरपणा कसा लुळापांगळा होतो याचे, चक्रावून टाकत सुन्न करणारे दर्शन 'सखाराम-–' मधून घडते– हे एका शोकांताचेच दर्शन! 'सखाराम-–' हे काय प्रकरण आहे, हे यावरून ध्यानात यावे.

'सखाराम–' चा 'पूर्वांक' म्हणजे 'त्याची पाचवी-–' आता समजून घेणे सोपे जावे. (खरे तर, ते वाटते

अनुक्रमणिका

इतके सोपे नाही, किंबहुना, 'अनवट/अप्रचलित राग' समजून घेण्यासारखेच, ते बिकट आहे, हे हळूहळू लक्षात येत जाईल.)

'त्याची पाचवी—' चा प्रारंभ, थंडीच्या दिवसांत, मध्यरात्री, छोट्या गावातील सरकारी इस्पितळात होतो — सखाराम व दाऊद, हातगाडीवरून, एका अत्यवस्थ बाईला 'ॲडमिट' करण्यासाठी घेऊन येतात— हीच ती, सखारामच्या आयुष्यामधली, 'करारा' ने बांधलेली, 'पाचवी'- तिची गंभीर अवस्था बघून, तिला सलाईन लावण्यासाठी, नर्स तिला वार्डात घेऊन जाते- झोप अनावर झाल्यामुळे, सखारामच्या सांगण्यावरून, पण काहीशा अनिच्छेनेच, दाऊद घरी जातो- तिथेच बसल्या बसल्या सखाराम पेंगायला लागतो- त्याला स्वप्न पडते- - ती 'पाचवी' जरा बऱ्या स्थितीत, बऱ्या रूपात दिसते- - आपल्या पहिल्या मेलेल्या नवऱ्याच्या इच्छेप्रमाणे, आपण सखारामबरोबर राहिलो, झोपलो, वैगेरे ती सांगते- -यामुळे सखाराम चांगलाच भडकतो-'कोडगे, ..... रांडेसारखी रमलीस तू भोगामध्ये....' म्हणून अद्वातद्वा बोलू लागतो- तेवढ्यात, 'पेशंटला शुद्ध आलीय' असे सांगत नर्स येते- तिच्या सांगण्याप्रमाणे, सखाराम तिच्या मागे वॉर्डात जातो- पण पडलेल्या स्वप्नामुळे तो अगदी सुन्न झालेला असतो. इथे पहिले दृश्य संपते.

दुसरे दृश्य सुरू होते दुसऱ्या दिवशी, टळटळीत दुपारी, सखारामच्या जुनाट घरात- दाऊद आल्यामुळे, मृदुंग बडवणारा बेचैन सखाराम वाजवणे थांबवतो- दोघे एकामेकांशी बोलू लागतात- मुख्य विषय, मेलेल्या 'पाचवी' चे (म्हणजे 'करारा' प्रमाणे रहात असताना मेलेल्या 'पहिली' चे) 'शेवटचे संस्कार', हा असतो- ती मेल्याबरोबर 'करार' संपलेला असल्यामुळे 'संस्कार' करायला सखाराम अजिबात तयार नाही, तर ती आपली 'भाभी', 'संस्कार झाले पाहिजेत' म्हणून, दाऊद सखारामचा पिच्छा पुरवतो- शेवटच्या श्वासापर्यंत आपला हात धरून, 'साली आपल्या मेलेल्या नालायक नवऱ्याबद्दल पुळका घेऊन, बोलत राहिली', यामुळे भडकून, पण थंडपणे, संस्कारांना नकार देणारा सखाराम, अखेरी 'दाऊद' साठी (हॉस्पिटलमधे पडलेल्या तिच्या मुड्यासाठी, बेवारस बॉडीसाठी, नव्हे) 'तिचे विधी करेन मी', असे आश्वासन देतो-(दोघेही शांतपणे 'पीत पीत' बोलत असतात, हे विसरता कामा नये)-इथे दुसरे दृश्य पुरे होते.

तिसरे दृश्य आहे 'तेराव्या दिवसा'चे, स्मशानभूमीतले- – दाऊदच्या मदतीने, ब्राह्मणाच्या सूचनांप्रमाणे, सखाराम (नाइलाजाने) 'पाचवी'चे 'विधी' उरकतो आहे- "ती बाई आपली कुणी लागत नव्हती, ..... काही देणं लागत नाही आपण,.....काय हक्क होता तिचा माझ्यावर?....." असे चडफडत, शिव्या घालत, क्रियाकर्म चालू आहे — काही केल्या कावळे 'पिंडा'ला शिवत नाहीत-ब्राह्मणाच्या सांगण्यासवरण्याप्रमाणे, सखाराम मृतात्म्यास उद्देशून बडबडत राहतो-"चल आवर, जळू साली! बोल, शेवटची इच्छा काय आहे?.... पुरवायला सोपी इच्छा सांग".....पण कावळे 'पिंडा'जवळ फिरकतच नाहीत- शेवटी, दाऊदच्या सल्ल्याप्रमाणे, सखाराम मृतात्म्यास सांगतो—"आपण स्वत:ची काळजी घ्यायला समर्थ आहोत....."— आणि अचानक, गलका करून, कावळे 'पिंडा'वर तुटून पडतात- – यावर सखारामची कडवट टिप्पणी अशी- "आधीच साल्यांनी हादडलं होत, ते जिरलं, पुन्हा भूक लागली, भडव्यांनी मारला हात पिंडावर-" पीडा टळली एकदाची म्हणून सखाराम खुशालतो- तेवढ्यात, एक मुलगा येऊन सांगतो. "तिकडं रस्त्यावर एक बाई रडून राहयलीय कवाची, या या!,"— सखाराम तिकडे जातो- कावळ्यांची 'कोरस' कावकाव वाढत जाते- इथे तिसरे दृश्य संपते. (सखाराम रडणाऱ्या बाईला आधार द्यायला जातो ही 'सहावी'च्या येण्याची म्हणजे 'त्यांची पाचवी'- 'च्या शेवटच्या दृश्याची व 'सखाराम बाइंडर' च्या पहिल्या दृश्याची सहज सूचना! हे सुज्ञांस सांगणे न लगे!)

यानंतर सुरू होणारे चौथे दृश्य (म्हटले तर 'तिसऱ्या'चेच विस्तरण) अफलातून आहे. एक 'प्रतिभावंत' कावळा भाष्यकार सूत्रधाराप्रमाणे, प्रेक्षकांना उद्देशून निवेदन करतो आहे-...."मला दिसतो आहे त्या मृत स्त्रीचा ('पाचवी'चा) आत्मा- जिथे सर्व आत्मे पोहोचतात, तिथे पोहोचलेला-हा स्वर्ग किंवा काहींचा नरक-" असे औपरोधिक, उपहासप्रधान भाष्य चालू असतानाच, ती स्त्री (अशरीर रूपात) उल्हासाने प्रवेश करते— "शरीरा- बिरीराची झंझट नाही, लिंगपिसाट पुरुषांकडून भोगून घ्यायचं. वेळ आल्यास गर्भार व्हायचं- या बाईपणातून





सुटका झाली एकदाची...." यामुळे ती कमालीची उल्हसित आहे तेवढ्यात एक पुरुष, काहीतरी हरवलेले शोधत, प्रवेशतो— "इथं आल्यावर सर्वच पुरुषांचं होतं तसं याचं झालंय, त्याच 'लिंग' (ज्यावर 'अंहकार' पोसला जातो ते) हरवलंय, ते सापडतच नाही (अशरीर अवस्थेत कसं सापडणार ?) म्हणून त्याला 'लिंगशोक' झालाय !" या सगळयावर त्या 'प्रतिभावंत' कावळ्याची 'मल्लीनाथी' फारच छद्‌मी आहे—शरीरविहीन अवस्थेतही एकमेकांना छेडणाऱ्या या 'जोडी'ला 'चित्रगुप्त' (डायरेक्टर ऑफ द डिपार्टमेंट ऑफ हेवनली अफेअर्स) परत योग्य रांगेला लावतो, त्यानंतर 'तो' कावळा एक महत्त्वाचं रहस्य उघड करतो, 'लिंग-शोक-मग्न' पुरुष म्हणजे त्या मृत स्त्रीचा ('पाचवी'चा) पूर्वी मेलेला नवरा होय; गंमत म्हणजे ती दोघं समोर येऊनही एकामेकांना ओळखत नाहीत; हीच मरणातली खासीयत !– जिवंतपणीही होतं हे कधीकधी !– इथे, एका मोठ्या काळजीत अडकलेला 'तो' कावळा सखारामच्या नव्या खेळाकडे लक्ष वेधतो,आणि हे भन्नाट दृश्य संपते.

इंग्रजी लिखितात, छोटेसे पाचवे दृश्य आहे— 'सखाराम बाइंडर'च्या पहिल्या दृश्याचा प्रारंभ दाखवणारे; पण मराठी लिखितात, आधीचे नाट्य संपते, 'सखाराम--'चा पहिला प्रवेश सुरू होतो, अशी चटावर बोळवण आहे !–असो.

'सखाराम—'चा 'पूर्वांक' म्हणजे 'त्याची पाचवी'-- समजण्यासाठी, आतापर्यंत विस्ताराने समालोचन केले आहे.(तरीदेखील बऱ्याच तेंडुलकरी 'मख्ख्या' सोडूनच द्याव्या लागल्या आहेत.) याच्या आधारे, 'पूर्वांक'– 'त्याची पाचवी'-चे जर खोलात आकलन करता येते का हे बघू......

'सखाराम बाइंडर' व 'त्याची पाचवी—' या दोहोतही दिसणारे सखाराम व दाऊद यांच्यांत सही-सही साम्य आहे, संगती आहे; पण गंमत, नव्हे, नवल म्हणजे 'सखाराम—' मधील लक्ष्मी (सहावी) व 'पाचवी–'त मृत झालेली ती पतिनिष्ठ स्त्री (पाचवी) या दोघींत काही बाबतीत साधर्म्य आहे. ही पाचवी "विधवा असून मंगळसूत्र गळ्यात घालायची, सखारामला हात लावू नाही दिला कधी त्याला. त्याच्याबरोबर झोपताना न विसरता काढून ठेवायची"– एवढी विलक्षण पतिनिष्ठा ! सात्त्विक लक्ष्मीचा सखारामवर खोल प्रभाव पडला, तसाच तो नाटाककारावर (म्हणजे तेंडुलकरांवर) देखील पडलेला असावा (कदाचित् व्यक्ती तेंडुलकरांवरच आयुष्यात अशा स्त्री नमुन्याचा खूप जवळून प्रभाव पडलेलाही असू शकेल !); त्यामुळेच, 'पाचवी—'च्या चित्रणात लक्ष्मीच्या सत्त्वगुणी रंगछटी नकळत मिसळल्या गेल्या असणे शक्य आहे.

'सखाराम—' व 'त्याची पाचवी—' मधील ठळक वेगळेपण कळायला वेळ लागण्याचे काहीच कारण नाही. "माझ्याकडे राहात असताना मेलेली ही पहिली बाई," ....." मरणाने नेलेली ही पहिली बाई", असे सखारामकडून वारंवार ऐकायला मिळते, त्यामुळे वेगळेपण अधोरेखीतही होते आणि अगदी स्पष्टही होते.....'सखाराम–' मध्ये स्वतः तोच, आपले मूलसत्त्व गमावून बसल्यामुळे, पतंग कटल्यावर निर्जीवपणे ओघळत ओघळत मांजा मातीत गळून पडतो तसा, मेल्याहून मेला होऊन जातो, हे आणखी एक विरोधी (Contrast असणारे) निराळेपण होय.

माणसाच्या मरणोत्तर अवस्थेचे अजब दर्शन व त्यात अध्याहृत असलेले त्यावरील कलात्म (नाट्यात्म) भाष्य ही 'सखराम—'चा 'पूर्वांक' म्हणून अवतरलेल्या 'त्याची पाचवी–' ची खरी खासीयत आहे." अशा एकेकाळी जोडपं असलेल्या–आता शरीरहीन– लिंगहीन, उरोजहीन, नितंबहीन (योनीहीन हे 'His Fifth Woman' – म्हणजे इंग्रजीतील,मूळ तेंडुलकरी नाटकात ध्वनित.....) मानवी आत्म्याचं यानंतर काय होतं ?" हा अखेरचा सवाल गंभीर,गलबलून टाकणारा आहे. 'सफर' या तेंडुलकरांच्या तशा बऱ्याच आधीच्या नाटकात मोठ्या माणसाच्या (बालसदृश) वस्त्रविहीन स्थितीसारखी ही देहविहीन (म्हणजे फारच पुढची) अवस्था 'सुंदर' (आनंददायकही) असली तरी तिच्याविषयीचा उपरोक्त प्रश्न अस्वस्थ करणारा, घुसमटून सोडणारा आहे, हे नाकारता येणार नाही.

'सखाराम–' नंतर लिहिलेल्या, पण त्याचा 'पूर्वांक' म्हणून लिहिलेल्या, 'त्याची पाचवी–' मध्ये अगोदरच्या ओळखीच्या खुणा आहेत— (तशा तेंडुलकरांच्या किंवा इतरांच्याही नाट्यकृतींच्या खुणा मधूनच ओझरत्या,

झर्रकन, येऊन जातात–अगदी उघड उदाहरणे—'कमला' किंवा 'महानिर्वाण'–); परंतु हा 'पूर्वांक' पश्चात् प्रातिभ आहे, हे कबूलच करावे लागते. येथे, 'His Fifth Woman' चे दिग्दर्शक स्टर्गिस वॉर्नर यांचे " Ten's exploration of death and the afterlife resonate with humour and insight,......His version of the afterlife does give us one pause,......" हे म्हणणे, आणि खुद्द तेंडुलकरांचे " I could never have written this play in 1972, it just was't in me ", हे सांगणे, पुरेसे बोलके नाही का?..... वय, प्रकृती यामुळे तेंडुलकर बाहेरून कोळपलेल्या विस्तवासारखे झालेले असले तरी आतून ते राखेखाली रसरसणाऱ्या निखाऱ्यासारखे धगधगते–फुलते होते; म्हणूनच, असा पुढे जाणारा 'पूर्वांक' ते लिहून गेले, हे उघड आहे.

आयुष्याच्या उतरणीवरच्या, मावळतीवर टेकलेल्या, तेंडुलकरांच्या मनोवस्थेचे, अंतर्यामाचे पडसाद या 'पूर्वांका'त ऐकू येतात– उदाहरणार्थ– "कधीतरी उशिरा लक्षात येते की यातल्या काही गोष्टी केल्या असत्या, निदान करून पाहिल्या असत्या, तर बरे झाले असते; पण उशिर झालेला असतो" हे तेंडुलकरांचे सुषमाला लिहिलेल्या पत्रातून व्यक्त झालेले मनोगत, आणि, " चांगल्या गोष्टी उशिराच सापडतात की हो आयुष्यात – वाईट लवकर सापडतात – आणि त्या वाईट आहेत हे कळेपर्यंत घात केलेला असतो त्यांनी आपला" हे 'पाचवी' चे मरणोत्तर स्वगत. (अशी आणखीही उदाहरणे देता येतील– जिव्हार अन् जिव्हारीच्या जखमादेखील दाखवणारी!)

आता अखेरची दोन निरीक्षणे – समारोपादाखल–

(१) 'तें०' नावाचे बाबा' हेलावून सोडत असले तरी ते 'तें०'-ची वैचारिक धार जाणवून देते.

(२) 'त्याची पाचवी–' तेंडुलकरांनी विकल स्थितीत लिहिले असले तरी ते त्यांच्या नाट्यशक्तीची लखलखीत धार दाखवून जाते.

तेंडुलकरांच्या प्रथम स्मृतीदिनी त्यांना ही लेखरूप श्रद्धांजली!

**पुरवणी**

१९ मे २००९ रोजी, तेंडुलकरांच्या पहिल्या स्मृतिदिनी, लेख पुरा केला, त्याच दिवशी संध्याकाळी, 'तें० दिवस (आरंभकाळ)' हे तेंडुलकरांचे पुस्तक प्रकाशित झाले. हे तेंडुलकरांचे अखेरचे लिखित व मरणोत्तर प्रकाशित पुस्तक, त्याचा परामर्श घेतल्याशिवाय ही लेखरूप श्रद्धांजली पूर्ण होणार नाही, म्हणून ही पुरवणी—

तेंडुलकर पुण्यात, 'प्रयाग रुग्णालया'त असताना, त्यांना दोनदा भेटलो होतो– १०.५.०८ रोजी झालेली आमची भेट ही शेवटची ठरली. भेटीत लक्षात आले की त्यांच्या देहाची अवस्था क्लेशदायक झालेली असली तरी मनःस्थिती शांत आहे– हे त्यांच्या गंभीर मुद्रेतून उमगत होते– त्यांच्या डोळ्यांत पूर्वीची चमक दिसत होती. रुग्णशय्येवर काही कागद पसरलेले, त्यावर कापऱ्या, नेहमीसारख्या बारीक–कोरीव अक्षरांत थोडा त्रुटित मजकूर लिहिलेला. त्यांमधून हे पुस्तक तयार झाले, हे ते बघितल्यावर ध्यानात आले. (पुण्याच्या नामांकित 'राजहंस प्रकाशना'चे, त्यांच्या व तेंडुलकरांच्या इतमामाला साजेसे देखणे, चेतोहर असे हे पुस्तक.)

'तें० दिवस' या पुस्तकात काय आहे? कंसातील उपशीर्षकात म्हटल्याप्रमाणे, तेंडुलकरांच्या आयुष्याशी संबंधित असा 'आरंभकाळ' म्हणजे साधारण १९२८ ते १९४८ हा २० वर्षांचा काळ– आत्मकथनातून आलेला आहे. एका सर्जनशील, चिंतनप्रवण लेखकाने आपल्या प्रारंभिक आयुष्याचे, स्वतःच्या कौटुंबिक व सामाजिक परिवाराचे, त्याला लगटून असणाऱ्या घडामोडींचे, त्यांमधील खळबळीचे विहंगमावलोकन केले ते या पुस्तकात प्रामुख्याने पाहावयास मिळते.

या पुस्तकाचे नेमके महत्त्व कशासाठी आहे? प्रकाशकांच्या शब्दांत सांगावयाचे तर "तेंडुलकरांच्या अन्य लेखनातून सहसा न आढळणाऱ्या कौटुंबिक तपशिलासाठी, इतक्या सविस्तरपणे तो वाचकांसमोर प्रथमच येत आहे" यासाठी, या पुस्तकाचे महत्त्व आहे. प्रकाशकांचे म्हणणे बरोबरच आहे; पण माझ्या मते विशिष्ट तीन गोष्टी अधोरेखित करून नमूद केल्या पाहिजेत. (प्रकाशकांच्या, प्रत्यक्ष पुस्तकातील, दोन प्रास्ताविक लेखांमध्ये या गोष्टी चांगल्या रीतीने सूचित झालेल्या आहेत, हेसुद्धा येथे सांगायला हवेच.)

अधोरेखित करून नमूद कराव्या अशा तीन विशिष्ट





अनुक्रमणिका

गोष्टी—

१. माणूस व लेखक म्हणून तेंडुलकरांची जडणघडण वेगवेगळ्या, उलटसुलट क्रियाप्रतिक्रियांतून कशी होत गेली, विशेषतः चाकोरीबाहेरचे जीवननाट्यवेड कसे रुजत - अंकुरत गेले, ही पहिली गोष्ट.

२. तेंडुलकरांची मनःप्रकृती त्यांचे सर्व बाबतीमधील अलिप्त साक्षित्व (त्यांचा सूचक शब्द 'कोरडी' मनोठेवण), केव्हा–कोठे–कसे प्रकट झाले, ही दुसरी गोष्ट.

३. तेंडुलकरांची मूळ शक्ती —माणूस असो, घटना असो, समस्या असो, तत्त्व असो, सगळ्याच्या मुळाला धरणारी, सगळ्याची खोल नस पकडणारी– जाणीवपूर्वक वा नेणीवपूर्वक, सहजपणे कशी व्यक्त होई, ही तिसरी गोष्ट.

या तीनही गोष्टींवर वयाचा, प्रकृतीचा परिणाम कधीच झाला नाही, हे तर खास समान वैशिष्ट्य. (विवाद्य ठरू शकेल असे-)

प्रस्तुत परामर्शाचे उद्दिष्ट किंवा प्रयोजन, पुस्तकपरिचय वा परीक्षण हे नव्हते, नाहीही. तेंडुलकरांच्या पहिल्या स्मृतिदिनी प्रकाशित झालेल्या त्यांच्या अखेरच्या पुस्तकाच्या आधारे काही महत्त्वाची निरीक्षणे नोंदवण्यापुरताच हा परामर्श प्रपंच केला. यामुळे आता, तेंडुलकरांना अर्पिलेली ही लेखरूप श्रद्धांजली पूर्ण होत आहे, असे निःशंकपणे म्हणण्यास कोणताही प्रत्यवाय नसावा.

जाता जाता समारोपादाखल एक मुद्दा– 'तें. नावाचे बाबा' या सुषमाच्या पुस्तकाबरोबर, 'तें. दिवस' या तेंडुलकरांच्या स्वतःच्या पुस्तकाच्या योगे, 'त्याची पाचवी--' या पुस्तकातील काही जागांवर चांगला प्रकाश पडू शकेल. पण इथे ठामपणे काही म्हणणे हे तेंडुलकरपश्चात् अप्रशस्त होय आणि तेंडुलकरांकडून खातरजमा करून घेणे शक्य नसल्यामुळे ते धाष्टर्याचे व धोक्याचेही ठरेल. तेंडुलकरांचे आत्मकथन अखेरच्या टप्प्यापर्यंत पुरे होऊ शकले असते तर त्यांचा, त्यांच्या जगण्याचा–जीवनाचा, तसेच त्यांच्या एकूण साहित्याचा (केवळ एका किंवा अन्य कोणत्याही नाटकाचा नव्हे) अधिक उलगडा कदाचित् झाला असता. परंतु हे होणे नव्हते, आता ते कधीच होणे शक्य नाही. तेंडुलकरांचा शब्द वापरून म्हणायचे तर ही आपली 'नियती'! स्मृतिरूप तेंडुलकरांना मनोमन अभिवादन!



अनुक्रमणिका





# स्वा. सावरकरांच्या साहित्यातील इतिहासदर्शन

– डॉ. सो. रा. शेंडे

इ. स. २००८ हे वर्ष स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांच्या जन्माचे शतकोत्तर रौप्यमहोत्सवी वर्ष आहे. त्या निमित्ताने त्यांची इतिहासविषयक भूमिका समजावून घेण्याच्या उद्देशाने ह्या शोध-निबंधाची मांडणी केलेली आहे. स्वा. सावरकरांचे कार्य आणि कर्तृत्वाचा विचार करता असे दिसून येते की, ते एक तत्त्वनिष्ठ देशभक्त, जहाल हिंदुत्ववादी नेते, व्यासंगी साहित्यिक व प्रेरणादायी इतिहास लिहिणारे एक ओजस्वी इतिहासकार होते. त्यांनी केलेल्या विपुल लेखनातून त्यांचे व्यक्तिमत्त्व व त्यांच्या विचारांचे विविध पैलू दिसून येतात. त्यापैकी सावरकरांची इतिहासाकडे पाहाण्याची कोणती दृष्टी होती?, इतिहासाबाबत व त्याच्या वाचन-लेखनाबाबत, इतिहासातील चरित्रनायकांबाबत, भारतीय इतिहासातील प्रेरणादायी प्रसंगांबाबत त्यांची काय भूमिका होती? याबाबत त्यांनी लिहिलेल्या साहित्याच्या आधारे शोध घेण्याचा प्रयत्न या निबंधातून केलेला आहे.

## सावरकरांचे इतिहास लेखन

सावरकरांनी इतिहासावर भाष्य करणाऱ्या काही स्वतंत्र ग्रंथांची रचना केली. त्यात, त्यांनी १९०७ साली इंग्लंडमध्ये लिहिलेला 'अठराशे सत्तावनचे स्वातंत्र्य समर', मराठ्यांच्या इतिहासावरील प्रामुख्याने त्यांच्या पराक्रमावर प्रकाशझोत टाकणारा, 'हिंदुपदपादशाही', नेपाळमधील हिंदुंच्या पराक्रमाचे वर्णन करणारा 'नेपाळी आंदोलनाचा इतिहास', 'भारतीय इतिहासातील सहा सोनेरी पाने', 'शिखांचा इतिहास', 'जोसेफ मॅझिनीचे चरित्र' इत्यादींचा समावेश करावा लागतो. त्यातून सावरकरांनी केलेल्या इतिहासाच्या मांडणीच्या आधारे त्यांच्या इतिहासविषयक भूमिकेवर प्रकाश टाकता येतो.

तत्कालीन राजकीय परिस्थितीत स्वातंत्र्यवीर सावरकरांनी 'अठराशे सत्तावन्नचे स्वातंत्र्य समर' या ग्रंथातून ब्रिटिश सत्तेविरूद्ध लोकमत तयार करून स्वातंत्र्य प्राप्तीची प्रेरणा निर्माण करण्याचा प्रयत्न केला. या ग्रंथाविषयी आपले मत व्यक्त करताना संशोधक प्र. ल. गावडे लिहितात, '५७ चे स्वातंत्र्य समर' हा ग्रंथ सावरकरांनी मुख्यतः भारतात क्रांतीचा प्रचार व्हावा आणि सत्तावन्नच्या सालाप्रमाणे सर्व भारतभर स्वातंत्र्यार्थ पुन्हा अुठावणी व्हावी या हेतूने लिहिला असावा, असे पुराव्यावरून सिद्ध करता येईल."[१] त्यांच्या या ग्रंथाचे अनेक इतिहासकारांनी जे महत्त्व स्पष्ट केलेले आहे त्यात, न. र. फाटक असे लिहितात की, '..... शिपायांच्या उठावाला बंड लेखून त्याच्या अनुरोधाने हिंदू जनतेला नालायक ठरवू पाहणाऱ्या मतप्रणालीची प्रतिक्रिया म्हणजे वीर सावरकरांचे पुस्तक असून त्याला प्रतिक्रियेपुरते संदर्भ साहित्याच्या परंपरेत अवश्य स्थान आहे. .....' रा. वि. ओतूरकर असा अभिप्राय देतात की, '१८५७ चे समर हे निव्वळ भौतिक हक्कांचा झगडा नसून ते पवित्र स्वातंत्र्य युद्ध होते. ही गोष्ट.... ठसठशीतपणे प्रथम मांडण्याचे काम वीर सावरकरांनी केले .....' 'हिंदुपदपादशाही' या पुस्तकाबाबत सावरकर लिहितात की, '..... शक्य तितक्या तिऱ्हाईत दृष्टिने बघितले तरी आमचे आम्हास ते पुस्तक मराठ्यांच्या तत्कालीन इतिहासावरील इतर आज उपलब्ध असलेल्या कोणत्याही पुस्तकापेक्षा अत्यंत मार्मिक आहे असे वाटते. श्री. ग. वि. केतकर 'हिंदुपदपादशाही' या पुस्तकाचा 'जिवंत इतिहास लेखन' या शब्दात गौरव करतात.'[२] 'भारतीय इतिहासातील सहा सोनेरी पाने' या सावरकरांच्या इतिहास लेखनाबाबत आपले मत मांडताना प्र. ल. गावडे लिहितात, ..... 'हिंदुपदपादशाही', 'नेपाळी आंदोलनाचा इतिहास' व 'भारतीय इतिहासातील सहा सोनेरी पाने' हे ग्रंथही सावरकरांनी हिंदुराष्ट्र दृष्टिकोणातूनच लिहिले आहेत.... सावरकरांनी लिहिलेल्या सर्व इतिहास वाङ्मयाचे स्वरूप हिंदुराष्ट्रदृष्ट्या केलेल्या समीक्षणाचे आहे ......'[३] ....... सावरकरांचा, भारतीय इतिहासातील सहा सोनेरी पाने' हा ग्रंथ म्हणजे हिंदुंच्या या विजय चिन्हांनी मुद्रांकित

अनुक्रमणिका







झालेला ग्रंथ होय. ... या ग्रंथामागे सावरकरांच्या व्यक्तिमत्त्वातील हिंदुत्वनिष्ठा हीच प्रेरणा प्रबळ होती. हिंदुपदपादशाहीच्या उत्तरार्धाच्या कालखंडात सावरकरांनी हिंदुंच्या पुनरूत्थानाचा आलेख काढलेला आहे .... इ. स. १००० ते १०३० या कालखंडात सर्व हिंदुस्थानावर मुसलमानांचे राज्य नावापुरतेही नव्हते आणि भारत राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक व व्यापारविषयक बाबतीत वैभवशाली देश म्हणून नांदत होता ... पुढे मराठ्यांनी 'हिंदवी स्वराज्याची स्थापना केली.' 'आक्रमण', हे नव्या मराठी रणनीतीचे सूत्र बनविले आणि अटकेपर्यंत जरीपटका फडकावून ..... अखेर हिंदुस्थानवरील मुस्लीम राजसत्ता हिंदुंनी पादाक्रांत केली..... ब्रिटिशांच्या आक्रमणाच्या काळातही हिंदुस्थानच्या सार्वभौमत्वासाठी ब्रिटिशांना लढावी लागलेली सारी युद्धे हिंदुंशीच लढावी लागली. .... याच दृष्टिकोणातून मराठ्यांच्या इतिहासाचे सविस्तर समीक्षण सावरकरांनी केले आहे.[४] 'भारतीय इतिहासातील सहा सोनेरी पाने' या पुस्तकाची कसोटी सावरकरांनी हिंदुराष्ट्रवादी दृष्टीनेच ठरविलेली दिसून येते. सावरकर लिहितात, 'कोणत्याही राष्ट्रावर पारतंत्र्यासारखे प्राणसंकट जेव्हा गुदरते .... तेव्हा तेव्हा त्या प्रबळ शत्रुचा पाडाव करून नि पराक्रमाची पराकाष्टा करून राष्ट्रास त्या पारतंत्र्यातून मुक्त करणारी ... आणि आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचे आणि स्वराज्याचे पुनरुज्जीवन करणारी झुंजार पिढी, तिच्या नि तिला झुंजविणारे जे धुरंधर वीर नि विजयी पुरुष त्यांच्या त्या स्वातंत्र्य युद्धाच्या वृत्तांताचे जे पान, त्या पानास मी येथे सोनेरी पान म्हणून संबोधित आहे.'[५] 'नेपाळी आंदोलनाचा इतिहास' हे पुस्तक सावरकरांनी लिहून त्यात नेपाळच्या पराक्रमी इतिहासाचे आणि त्यांनी केलेल्या यशस्वी हिंदु – स्वातंत्र्य संरक्षणाचे वृत्त दिलेले आहे.[६] शिखांच्या इतिहासाची मीमांसाही याच हिंदूराष्ट्रदृष्टीने सावरकरांनी केलेली आहे. 'महाराजा रणजित सिंगाने पंजाबातून मुसलमानांचे राज्य उखडून देवून ... जम्मू काश्मीर पर्यंत वाढविले. शिखांच्या पराक्रमाचे वर्णन करताना हिंदूपदपादशाही या पुस्तकात सावरकर लिहितात, 'शिखांनी सिंधुनद ओलांडला आणि विजयाने हिंदुध्वज काबूल नदीपर्यंत नेवून अबदालीचे उसणे फेडले.'[७] सावरकरांनी १९०६ साली लिहिलेल्या 'जोसेफ मॅझिनी' या ग्रंथात मांडलेली तत्त्वे सावरकरांना भारतात साकार करावयाची होती. 'जो क्रांतीमार्ग मॅझिनीने सांगितला होता तोच सावरकरांना येथे पुरस्कृत करावयाचा होता, असे प्र. ल. गावडे म्हणतात.[८]

**सावरकरांचे इतिहासविषयक निबंध**

सावरकरांच्या निबंधवाङ्मयातून त्यांची जीवनदृष्टी प्रकट होताना दिसून येते. त्यांच्या ऐतिहासिक निबंधांमधून प्रामुख्याने हिंदुत्व हे प्रमुख सूत्र दिसून येते. त्यांच्या जीवनाचा हेतूच हिंदुराष्ट्राचे जागरण व उद्धरण करण्याचा होता. त्यामुळे त्यांच्या बहुतेक सर्व निबंधातून आपल्या ध्येयाचा, तत्त्वांचा व मतांचा प्रचार करण्याचा हेतू स्पष्टपणे दिसून येतो. मॅजेस्ट्रिक प्रकाशनाने फेब्रु. १९७३ साली प्रकाशित केलेल्या 'रणशिंग' या पुस्तकात सावरकरांच्या इतिहासविषयक निबंधांचा समावेश करण्यात आलेला आहे. त्यात, प्रामुख्याने 'शिवछत्रपतींचा जयजयकार', 'शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचे सूत्र', 'डॉ. आंबेडकरांना उत्तर – विजयशील हिंदुराष्ट्र', 'हिंदुसंघटकांनी आपल्या राष्ट्राचा इतिहास कसा लिहावा नि कसा वाचावा', 'केमालपाशाने केलेले तुर्कस्थानातून अरबी संस्कृतीचे उच्चाटन', 'मुसलमानी खिलापतीचा उदय. ऱ्हास आणि विनाश' या निबंधांचा समावेश आहे. या पुस्तकास प्रा. राम कापसे यांनी प्रस्तावना लिहिलेली आहे. त्यात प्रा. कापसे लिहितात – 'खऱ्या इतिहास संशोधकाचा मूल्यविचार अंगात बाणलेले सावरकर इथे दिसतात. सत्य हेच इतिहासाचे प्रधान मूल्य! ...... 'इतिहास लिहावयाचा तर तो 'इति ह आस' असाच लिहावा. त्याचे वर्तमानकाळावर काय परिणाम होतील याची चिंता बाळगू नये.' ...... ह्या सत्यनिष्ठेबरोबरच इतिहासाचे मूल्यमापन करताना त्या काळाची परिस्थिती लक्षात घेवून ते केले जावे.....'[९]

'शिवछत्रपतींचा जयजयकार' हा लेख सावरकरांनी छ. शिवाजी महाराजांच्या त्रिशसांवत्सरीक महोत्सवानिमित्त लिहिला होता. तो ५ मे १९२७ रोजी 'श्रद्धानंद' मधून प्रकाशित झाला होता. या निबंधात सावरकर इस्लामी आक्रमणाचा व त्या राजवटीतील हिंदुस्थान व हिंदु यांच्या परिस्थितीचा आढावा घेताना लिहितात – '.... पृथ्वी आंदोळली! धर्म गेला! ...... कोठेही अल्पसुद्धा

अनुक्रमणिका

आशेचा किरण निरीक्षून निरीक्षून देखील दृष्टीपथात येत नव्हता. हिंदू लोकांच्या मनोवृत्तीवर निराशेची इतकी छाप बसली होती......"[१०] छ. शिवाजी महाराजांचे शौर्य, धाडस, कल्पकता, इत्यादी गुणांचे वर्णन करताना, अफझलखान वधाचा प्रसंग, शहाजीला सोडविण्यासाठी मुघलांच्या मदतीने केलेले कारस्तान, आग्ऱ्याचा बंदीवास व त्यातून सुटका इत्यादी प्रसंगांचे वर्णन करून त्यातून शिवाजी महाराजांचे विविध गुण स्पष्ट केलेले आहेत. शिवाजी राजांच्या संघटनकौशल्याविषयी सावरकर असे लिहितात की, '..... निरनिराळ्या योग्यतेचे स्वराज्य स्थापनेला अवश्य असणारे सर्व योग्य तरूण त्यांनी वेचून घेतले व त्यांच्यातूनच त्यांनी तानाजी, येसाजी, बाजी, मोरोपंत, सेनापती हैबतराव, वीरवर प्रतापराव गुजर इत्यादी स्वातंत्र्यवीर निर्माण केले. हिंदु जातीतील अठारापगड उपजातीतून त्यांनी समर्थ लोक निवडून काढले. ब्राह्मण, प्रभू, मराठे, भंडारी, कायस्थ इतकेच काय परंतु अस्पृश्यबंधू, महारमांगबेरडांसुद्धा त्यांनी आपल्या स्वराज्य संघटनेच्या कार्यात संमिलीत करून घेतले ......"[११] याच निबंधात सावरकरांनी इतिहासकार जदुनाथ सरकार, मन्रो इत्यादी इतिहासकारांनी मराठ्यांच्या इतिहासावर केलेल्या टीकांना परखडपणे उत्तर देवून त्यातून मराठ्यांचा गौरवशाली इतिहास मांडला. त्यांची मांडणी करताना सावरकर लिहितात, '..... रामदास शिवाजीच्या ह्या स्फूर्तीनेच मराठ्यांच्या तीन पिढ्या लढत राहिल्या ..... भाऊने दिल्लीचे तख्त फोडले. भीमथडीचे घोडे सिंधूचे पाणी प्याले विजयी भगवा झेंडा अटकेवर फडकावला......"[१२] छ. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे वर्णन करताना व त्याचे महत्त्व सांगताना सावरकर लिहितात, '...... शिवरायाने गत स्वातंत्र्याचे पुनरुज्जीवन नि हिंदुपदपादशाहीचे पुण्याहवाचन रायगडाच्या पुण्यभूमीवर सिंहासनरोहणाचा समारंभ घडवून आणून केले....."[१३] या निबंधाचा समारोप करताना सावरकर लिहितात की, '..... तीनशे वर्षांच्या अवधीनंतर हे हिंदुस्थान ह्या राष्ट्रवीराला उचित असा आपला कृतज्ञतेचा करभार सादर करीत आहे..... शिवभूपते! तू स्वीकार आणि इतकेच पसायदान दे की, तुझी दिव्य स्फूर्ती आम्हा सांप्रत हतबल बनलेल्या हिंदु जातीच्या अंगात संचरित व्हावी आणि तू तीनशे वर्षांपूर्वी हिंदु राष्ट्राचे, हिंदुधर्माचे आणि हिंदु जातीचे जसे पुनरुज्जीवन केले तसेच आजही करावयासाठी तुझ्याप्रमाणे आम्हालाही सामर्थ्य यावे![१४] "शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचे एक सूत्र" या निबंधात सावरकर लिहितात — '.... महाराज अगदी लहान होते. आठ एक वर्षाचे सुद्धा नसतील तेव्हापासून आपल्या धर्माची नि जातीची अवनती पाहून त्यांचे हृदय तळमळत असावे... तेव्हापासून माझ्या राष्ट्राच्या नि माझ्या धर्माच्या गौरवासाठी, स्वातंत्र्यासाठी, सामर्थ्यासाठी मी आपला प्राणही देईन ही प्रतिज्ञा करीत असावे. त्यांच्या चिमुकल्या मस्तकात 'हिंदवी स्वराज्याच्या प्रचंड कल्पना नि मनोहर स्वप्ने उदय पावत, विस्तार पावत, प्रसार पावत; .....' या उल्लेखातून शिवाजी महाराजांची राष्ट्रनिष्ठा व धर्मनिष्ठा प्रगट करण्याचा प्रयत्न सावरकरांनी केला. पारतंत्र्यात खिचपत पडलेल्या भारतीय जनतेने शिवाजी महाराजांच्या विचार व कार्यातून प्रेरणा घेवून पारतंत्र्यातून मुक्तीसाठी प्रयत्न करावेत, जागृत व्हावे असा सावरकरांचा उद्देश दिसून येतो.[१५] शिवाजी महाराजांच्या राजनीतीचे सूत्र सांगताना सावरकर लिहितात, 'हिंदुधर्माचे पुनरुज्जीवन करून स्वराज्याचा प्राणाधार जे स्वराज्य ते संपादन करणे ही इच्छा जर न्याय्य आहे, हे कृत्य जर धर्म्य आहे, हे ध्येय जर दैवी संपत्तीचे आगर आहे, तर मग त्या ध्येय्याचे सिद्धीसाठी ..... मी, केव्हा बळीस अगदी दुर्बळ दिसणारी वामनमूर्ती धारण करीन ..... कालयवनापुढे भरधाव पळ काढीन, भीमासारखा स्वैंपाकी होईन पण संधी साधताच एकाएकी उलटून रामासारखा रावणावर तुटून पडेन, नरसिंहासारखा घोर होईन ........ हे शिवरायाच्या राजनीतीचे सूत्र होते. म्हणूनच औरंगजेबासारख्या बादशहाचे तोडीस तोड देवून त्यांना हिंदुपदपादशाही स्थापन करता आली.[१६] "अटकेवर हिंदु विजयाचा भगवाझेंडा" या निबंधात सावरकर, अटकेवरील मराठ्यांच्या विजयाच्या घटनेचे वर्णन करताना लिहितात, 'हिंदुंच्या अर्वाचीन इतिहासात, म्हणजे कमीत कमी गेल्या एक हजार वर्षात हिंदुमात्रास अत्यंत गौरवास्पद असा जर कोणता दिवस उगवला असेल, तर तो होय की, ज्या दिवशी हिंदूच्या भगव्या झेंड्यास झुकवीत नेवून हिंदूंच्या विजयी सैन्याने त्यास

इ. स. १७५८ च्या एप्रिल – मे च्या संधीस अटकेवर रोविले!"[१७] याच निबंधात सावरकर लिहितात की, 'एकंदरीत पाहाता दाहिर राज्याच्या पराभवापासून म्हणजे आठव्या शतकापासून हिंदूंच्या पडत्या काळास आरंभ झाला. ....... पण हिंदूंच्या सुदैवाने तो शिवाजी जन्मास आला. इ. स. ७२७ पासून हिंदूंच्या पराक्रमास लागलेले खग्रास ग्रहण ९०० वर्षे टिकले. ..... १६२७ त शिवाजी जन्मल्या घटीस त्या ग्रहणाच्या मोक्षकालाचा पहिला विपल जन्मला. ..... शिवाजीने हिंदूंच्या स्वतंत्र साम्राज्याची संस्थापना केली.[१८] 'ह्या निबंधाचा समारोप करताना, हिंदूद्वेष्ट्याच्या हृदयात ही प्रबळ भीती ह्या अटकेच्या विजयदिनाची स्मृती उत्पन्न करो! आणि हिंदू हृदयात त्या भितीस सार्थ करील अशी कोण्या मोठ्या भीमपराक्रमाची जयिष्णु स्फूर्ती जागृत करो!! अशी आशा व्यक्त करतात.[१९] "डॉ. आंबेडकरांना उत्तर – विजयशील हिंदूराष्ट्र!" या निबंधात सावरकरांनी त्यांच्या दृष्टिकोणातून हिंदुस्थानची बदनामी करणारे व अक्षेपार्ह लेखन करणाऱ्याची मते खोडून काढण्याचा व हिंदुस्थानचा इतिहास गौरवशाली कसा आहे, हे दाखविले आहे. त्यांनी प्रथमतः कर्नल टॉड यांच्या राजस्थानविषयक उद्‌गारांचा समाचार घेवून नंतर डॉ. आंबेडकरांनी पंजाबमधील जातपात तोडक मंडळाच्या परिषदेतील अध्यक्षीय भाषणात भारतीय इतिहासाबाबत जे विचार मांडले त्यांची ती मते खोडून भारताचा इतिहास गौरवशाली कसा आहे हे पुराव्याने सिद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आहे. अर्थात त्या मागे सावरकरांचा भारतीय इतिहासाकडे पाहण्याचा दृष्टिकोण विचारात घेणे आवश्यक आहे. डॉ. आंबेडकरांनी आपल्या भाषणात — '.... हिंदू अजूनही जे जगत आहेत ते काही त्यांच्या पराक्रमाने नसून दुसऱ्याच्या पायाखाली सदासर्वदा तुडविले जात असताही अशा जिण्याची लाजच त्यांना कधी वाटली नाही ...... हिंदू समाजाचे जीवन हे सदा सर्वदा दासाचे जीवन होते ......' अशा आशयाचे उल्लेख होते. या अक्षेपांना उत्तर देताना सावरकर लिहितात, डॉ. आंबेडकरांचे वरील आक्षेप हे सर्वथैव खोटे आहेत. ....हिंदुराष्ट्राचा इतिहास अपजयशील नसून कोणत्याही राष्ट्रापेक्षा तो उत्कटपणाने विजयशीलच आहे!' असे सावरकरांनी या निबंधाचा समारोप करताना लिहिले आहे.[२०] "हिंदुसंघटकांनी आपल्या राष्ट्राचा इतिहास कसा लिहावा नि वाचावा" या निबंधात सावरकर प्रामुख्याने हिंदुस्थानचा गौरवशाली इतिहास लिहिला पाहिजे, अशा हिंदुत्ववादी भूमिकेतून इतिहासाची मांडणी करण्याबाबत सुचविताना लिहितात – '.... प्रत्येक हिंदुसंघटकाने हिंदुस्थानच्या वैदिक काळापासून तो आजपर्यंतच्या इतिहासाचा हिंदुत्वाच्या विशिष्ट दृष्टिकोणातून अभ्यास केलाच पाहिजे. ....वैदिक काळापासून ब्रिटिशांची सत्ता स्थापन होईपर्यंतचा इतिहास हिंदुसंघटकांनी ऐतिहासिक विशेषज्ञांनी सांगोपांग आणि अर्थ समन्वयी दृष्टीने अभ्यासावा. त्यावर ग्रंथ लिहावे. प्रसिद्धीची साधने मिळताच ते प्रसिद्धले जातील, पण तोवर निदान लिहून तरी ठेवावे. त्यातील निवडक कालखंडांची लहान सुबक नि सारांशमय पुस्तके मात्र शक्यतितक्या लवकर प्रसिद्धीली जावीत.....' या मांडणीतून सावरकरांची प्रचारकी विचारसरणी दिसून येते. इतिहासाचे लेखन करताना इतिहास लिहिणारांनी कोणती काळजी घेतली पाहिजे, इतिहासाचे लेखन कसे केले पाहिजे याबाबत सावरकर आपले विचार मांडताना त्यांचे इतिहासाचे तत्त्वज्ञान स्पष्टपणे दिसून येते. या निबंधात सावरकर लिहितात, '... इतिहास लिहावयाचा तर तो अगदी 'इति ह आस' असाच लिहावा. त्याचे वर्तमानावर काय परिणाम होतील, ह्याची तो इतिहास लिहितेवळी, त्याने मुळीच चिंता बाळगू नये. ऐतिहासिक संशोधनाने अद्ययावत म्हणून ठरवलेली त्या त्या कालखंडाची माहिती अगदी सत्य तशीच लिहावी. ....अवांछनिय घटनाही इतिहास लेखकांनी तितक्याच सत्यतेने सांगावयास हव्यात, जितक्या सत्यतेने आपल्या हिंदुराष्ट्रातील ..... सहस्त्रशः गौरवान्वित घटनांना स्वराष्ट्राभिमानी इतिहासकार व्यवस्थितपणे वर्णितात. ....' इतिहासलेखकाने निःपक्षपातीपणे इतिहासाचे लेखन केले पाहिजे. हे तत्त्व स्पष्ट करताना सावरकर लिहितात, '.... कोणी इतिहास लेखक वैदिक धर्माचा अभिमानी असेल, पण म्हणून त्याने पूर्वीच्या इतिहासातील आपल्या अवैदिक बुद्ध वा जैन धर्मियांशी वैदिक धर्मियांच्या काही वेळा झालेल्या विग्रहाचे वर्णन केवळ वैदिकांचीच बाजू उचलून धरण्यासाठी पक्षपाताने करू नये. किंवा तसे विग्रह आपापसात काही वेळा झाले ते लपवूही नये

अनुक्रमणिका

....' हिंदू राष्ट्राच्या अस्तित्वासाठी इतिहासाचा उपयोग कसा करून घ्यावा व त्यासाठी इतिहास कसा लिहावा नि वाचावा या विषयी या निबंधाच्या प्रारंभीच सावरकर लिहितात की, '..... सध्या आपल्या हिंदुराष्ट्राच्या अस्तित्वासाठी सुद्धा जी झुंज अनिवार्य झाली आहे ती लढण्यासाठी इतर साधनांप्रमाणेच प्रत्येक हिंदुसंघटकाला आपल्या हिंदुस्थानचा इतिहास कसा लिहावा नि कसा वाचावा, हिंदुसंघटनाला वर्तमानकाळात अधिक बलशाली करण्यासाठी भूतकाळाचा कुठवर नि कसा उपयोग करून घ्यावा हे कळणे आवश्यक आहे. .....आपल्या हिंदुत्वाच्या बौद्धिक मांडणीमध्ये हिंदुस्थानाचा इतिहास हिंदुसंघटकांनी कसा लिहावा नि कसा वाचावा हाही एक अध्याय अवश्य हवा....'[२१] इतिहास कसा वाचावा या बाबत विवेचन करताना सावरकर लिहितात, '.....हिंदुराष्ट्राचा इतिहास उचलताच प्रथमतः ही भावना मनात उद्‌भवली पाहिजे की, हा माझा अखिल हिंदूजातीचा इतिहास आहे. तो केवळ ब्राह्मणांचा नव्हे, केवळ जैनांचा नव्हे..... बंगालचा वा गुजराथचा नसून सर्व घटकांचा ... त्या हिंदुराष्ट्राचा, .....' ही राष्ट्रीय ऐक्याची भावना असली पाहिजे अशी सूचना ते देतात.[२२] इतिहास वाचताना वाचकाने त्याला वर्तमानाचे निकष लावू नयेत असे सांगताना सावरकर लिहितात, '.... हिंदुराष्ट्राचा इतिहास वाचताना हिंदुसंघटकांनी अशा समन्वय दृष्टीने वाचावा. भूतकाळातील कोणत्याही घटनेची चिकित्सा वर्तमान काळाचे उपनेत्र लावून करू नये. तर ज्या कालखंडात ती घटना घडली किंवा तशा विभिन्न समाजरचना होत्या, त्या काळाच्या परिस्थितीच्या प्रकाशात त्या निरीक्षाव्यात. त्याचे मूल्यमापन चांगले किंवा वाईट की अपरिहार्य हे ठरविण्याचा खरा निकष, म्हणजे त्याकाळची परिस्थिती, आजची नव्हे.....'[२३] इतिहासातील घटनांचा उल्लेख करताना आणखी कोणती काळजी घेतली पाहिजे याविषयी सावरकर लिहितात – '.... मागच्या इतिहासातील घटनांना उल्लेखितानासुद्धा ही काळजी अवश्य घ्यावी की, आमच्या इतिहासातील कलहाचा कोळसा पुन्हा पुन्हा उगाच उगाळत बसण्याचे शक्यतो टाळावे. आणि ज्या घटनांच्या वर्णनाने आजचे आपले हिंदुसंघटनाचे कार्य अधिक बळकट होईल .... एक राष्ट्रीयत्वाची भावनाही वाढीस लागेल अशाच आपल्या सर्वांच्या गौरवाच्या गोष्टी आज उपकारक ठरणाऱ्या राष्ट्रीय कुलकथा लेखांतून उल्लेखिल्या जाव्यात .....'[२४] "केमालपाशाने केलेले तुर्कस्थानातून अरबी संस्कृतीचे उच्चाटन" या निबंधातून सावरकर केमालपाशाने तुर्कस्थानात केलेल्या आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेवर प्रकाश टाकताना, त्याचे हे कार्य हिंदी लोकास कसे प्रेरणादायी ठरेल याबाबत विचार मांडताना सावरकर लिहितात '... आपल्या हिंदुस्थानच्या संक्रमणावस्थेत, तरुणतुर्कांच्या नेतृत्वाखाली आणि कर्तृत्वाखाली पूर्व तुर्कस्थानात तुर्कांचे जे प्रबळ राष्ट्र प्रगतीच्या घोडदौडीत आज अकस्मात पुढे सरसावले आहे त्याचा इतिहास आज हिंदी लोकांस बोधप्रद होणार आहे. त्यातल्या त्यात विशेषतः हिंदी मुसलमानांना तर या विषयाचे अत्यंत महत्त्व वाटले पाहिजे. कारण हिंदी – मुसलमानांचा फार मोठा भाग अजूनही अरबी संस्कृती हाच स्वतःचा अपरिवर्तनीय धर्म म्हणून समजतो; इतकेच नव्हे तर ती हिंदु समाजावर लादून तिची भाषा, लिपी, कायदा इत्यादींच्या साच्यात उभ्या भारतीय राष्ट्राचीच घडण बनविण्याचा अनावर मोह त्यास अजूनही होत आहे. .....'[२५]

**सावरकरांच्या कवितेतून होणारे इतिहासदर्शन —**

सावरकरांच्या कवितेतील इतिहास शोधताना आपणाला साधारणपणे व्यक्तिनिष्ठ कविता, सामाजिक व राजकीय प्रश्नांचा शोध घेणारी कविता, आर्थिक परिस्थितीवर प्रकाश टाकणारी कविता, शौर्य व पराक्रमाची कविता इत्यादी अंगांनी विचारात घ्यावी लागते. या सर्व कवितांच्या मुळाशी सावरकरांचे व्यक्तिमत्त्व, अन्याय व पारतंत्र्याची चीड आणि स्वातंत्र्याचा ध्यास, ऐतिहासिक व्यक्तींच्या कर्तृत्वाचा आधार घेवून वर्तमानात लोकजागृती करणे, राष्ट्रप्रेम जागविणे इत्यादी उद्देश स्पष्टपणे जाणवतात. सावरकरांची व्यक्तिनिष्ठ कविता. सावरकरांच्या व्यक्तिनिष्ठ कवितांमध्ये, राजा शिवछत्रपती, बाजीप्रभू देशपांडे, तानाजी मालूसरे यांच्या पराक्रमाचे, देशभक्तीचे वर्णन सावरकरांच्या निरनिराळ्या कवितातून दिसून येते. छ. शिवाजी महाराज हे प्रेरणास्थान मानून सावरकरांनी शिवाजी महाराजांवर कविता केल्या,त्यात 'श्रीशिवगीत' ही कविता सावरकरांनी इ. स. १९०० साली नाशिक येथे रचली. शिवाजी महाराज हे महाराष्ट्राचे

अनुक्रमणिका

दैवत, स्वातंत्र्याची प्रेरणा, वीरांची स्फूर्ती देवता असल्यामुळे सावरकरांनी ही कविता केली. कवितेच्या प्रारंभीच "नेती धर्मलयाते छळिती गो–द्विजवरां यवनकर्ते, श्रीशंकर शिवरूपे धर्माचे जाहले अवनकरते।।" राजा शिवाजी हा श्रीशंकराचा अवतार असून यवनांचे निर्द्रालन कण्यासाठी झाला आहे. असे सावरकरांना वाटते. या कवितेत शिवाजीचा स्वाभिमान व देशाभिमान प्रगट करताना सावरकर लिहितात, "लुटिले सर्व जिंही स्पर्श जो मायभवानीला सजला। तात तूम्ही सांगा वंदू मी अधम काय तो? मजला।। मरण वरिन, नाजाईन शरण म्हणूनि दास दुष्ट अधमाते। न लगे धन गज हय मज प्रिय जगती एक यवनवध माते।।"[२६] "श्री शिवाजी महाराजांची आरती" ही कविता सावरकरांनी १९०२ साली पुण्यात रचिली, ही कविता चार कडव्यांची असून या कवितेची सुरूवात, "जयदेव जयदेव जय जय शिवराया, या अनन्यशरणा आर्या ताराया" अशी आहे. त्याच्या दुसऱ्या कडव्यात सावरकर लिहितात, "त्रस्त आम्ही दीन आम्ही शरण तुला आलो, परवशतेच्या पाशी मरणोन्मुख झालो, साधु परित्राणाया दुष्कृति नाशाया, भगवान भगवद्‌गीता सार्थ कराया।।" या कवितेतून सावरकर शिवरायांची करूणा भकून पारतंत्र्याच्या संकटात सापडेल्या या हिंदु जनांना तारण्यासाठी आपण अवतीर्ण व्हा. अशा आशयाची विनवणी करतात.[२७] "शिववीर" ही कविता सावरकरांनी १९०३ साली त्रंबकेश्वर येथे केली. ही कविता सात कडव्यांची आहे. कवितेच्या पहिल्याच कडव्यात सावरकर लिहितात, "यवनांचा झाला, अवनीला भार। सुंदर मंदिरे भंगली पार। वेद–शास्त्रे नष्टांनी भ्रष्टविली सारी। गोमाता देखतां हरहर मारी। अधमांशी नाशोनी देशोद्धाराला। प्रभुवर भूवर शिववीर झाला।।१।।" असे शिवपूर्व दु:स्थितीचे वर्णन करून त्यातून मार्ग काढण्यासाठी शिवप्रभू या भूतलावर अवतरला याबद्दल आनंद व्यक्त केला. श्रीशिवरायाच्या पराक्रमाचे वर्णन करताना पुढे सावरकर लिहितात, "मातला अफजुल्ला यवनात भारी। तुळजापुरी भंगी भवानी सारी। ..... उदरा वीदारोनी नीचाला वधिला। प्रभुवर भूवर शिववीर आला।।५।।"[२८] "हिंदु नृसिंह" ही कविता सावरकरांनी अंदमानात असताना छ. शिवाजी महाराजांवर केली. या कवितेत सावरकरांनी वैभवशाली हिंदुस्थानाची कशी दुरवस्था झाली याचे वर्णन करताना लिहितात, "हा भग्न तट असे गडागडाचा आजी। हा भग्न आज जयदुर्ग आसवांमाजी। ही भवानीची ह्या पुन्हा गंजली धारा। ती म्हणूनि भवानी दे न कुणा आधारा।।", "गडकोट जंजिरे सारे। भंगले, जाहली राजधान्यांची। जंगले, परदास्य पराभावि सारी। मंगले, या जगति जगू आज गमतसे लज्जा, हे हिंदु नृसिंहा प्रभो शिवाजी राजा....."[२९] छ. शिवाजी महाराजांवरील या कवितांमधून सावरकरांची त्यांच्यावरील श्रद्धा व पराक्रमाच्या कथनाने पारतंत्र्यात खिचपत पडलेल्या या हिंद देशात चैतन्य निर्माण होऊन हिंदू लोक पेटून उठतील आणि भारत मातेला परवशतेतून मुक्त करतील असा विश्वास दिसून येतो. ज्यांनी पूर्वी पराक्रम गाजविला मातृभूमीसाठी प्राणाचे बलिदान केले अशा शूर वीरांच्या पराक्रमाचे गुणगाण हाही सावरकरांच्या कवितेचा विषय आहे त्यातूनच वीर बाजीप्रभू देशपांडे, तानाजी मालूसरे यांच्यावर त्यांनी पोवाडे रचिले. "श्री बाजी देशपांडे यांचा पोवाडा" हा १९ चौकांचा असून त्यात बाजीप्रभूने पावनखिंडीत गाजविलेल्या पराक्रमाचे वर्णन केलेले आहे. या पोवाड्यासाठी ज्यांचे आवाहन केले आहे त्यात, "....चितोडगडिंच्या बुरूजांनो त्या जोहारसह या, प्रतापसिंहा प्रथित–विक्रमा, या हो, या समया।। तानाजीच्या पराक्रमासह सिंहगडा येई, निगा रखो महाराज रायगड की दौलत आई।।" याच पोवाड्यात सावरकर पुढे शिवाजीचा दूत बाजीला जो निरोप देतो त्यातून बाजीचा स्वाभिमान जागा करून गुलामीवृत्तीचा धिक्कार करताना म्हणतो, "का जिने तुच्छ हे नेशी? का म्लेंच्छ कसाई भजसी? का दास्य – नरकिं तूं पिचसी?", "स्वराज्य नाही स्वदेश नाही धिक् त्या देहाला, चला घालू स्वातंत्र्य संगरी रिपूवरी घाला।।" शिवदुताचे बोल ऐकून बाजीचा स्वाभिमान जागा झाला, "शिवदुताचे बोल ऐकून बाजी मनि वदला। काळसर्प मी कसा उराशी मित्र म्हणून धरिला। घरात शिरला चोर तया मी मानियला राजा, बंड बोललो शिवरायाच्या परमपूज्य काजा।। माता माझी भ्रष्टविली मी राजनिष्ठ त्याशी, या पाप्याने युद्ध मांडिले देश – रक्षकाशी।।....." पावनखिंडीत बाजीचा पराक्रम,






त्याची स्वामीनिष्ठा व देशभक्ती याचे वर्णन करताना सावरकर पुढे लिहितात, "... तोफे आधी मरे न बाजी सांगा मृत्यूला, चला घालू स्वातंत्र्य संगरी रिपूवरी घाला।। ....." बाजीप्रभूच्या बलिदानाची प्रेरणा घेवून ब्रिटिशांच्या गुलामगिरीतून भारतमातेला मुक्त करण्यासाठी सावरकर आवाहन करतात, "श्रीबाजीचे रक्त पडिले खिंडीत त्या काला, म्हणूनि रायगडी स्वातंत्र्याचा थोर वृक्ष झाला।। अहो बंधुंनो! पूर्वज ऐसे स्वतंत्र रणगाजी, स्वतंत्र त्या पूर्वजां शोभतां वंशज का आजी?।। विनवी विनायक यांतिल घ्यावे समजुनि अर्थाला, चला घालु स्वातंत्र्य संगरी रिपूवरी घाला...."[३०] याशिवाय सावरकरांनी सवाई माधवराव पेशवे यांच्या रंगाच्या खेळावरील कविता, जव्हार संस्थानचे राजे कृष्णशहा, लो. टिळक यांच्यावरही कविता केलेल्या आहेत. त्या कवितांमधून त्यांचे देशप्रेम, पराक्रम, कर्तृत्व या गुणांचे वर्णन केलेले आहे. "श्रीमंत सवाई माधवरावांचा रंग" या कवितेत सावरकर, माधवरावांचा पराक्रम, शौर्य यांचे वर्णन करताना लिहितात, "... श्रीमंतांचे भाग्यप्रतापे द्वादश वर्षे बहु श्रमले, अटकेला यश पटका रोविला पुन्हा सर्वजण चट नमले, रजपूतादी शूर रिपूही श्रीमंतासी शरण आले, मोंगलपतिनी प्रसन्न होवूनि वजिर पदासी अर्पियले।।" .... "जिहीं रोविला महाप्रतापे जरिपटक्याला अटकेला, महादजीची स्वारी आली सरकारांना न्यायाला......"[३१] "श्रीमान राजे कृष्णशहा यांस" ही कविता सावरकरांनी १९०७ साली लंडन येथे असताना लिहिली. त्यात कृष्णशहांचे वैभव, न्यायनिष्ठा, शौर्य इत्यादी गुणांचे वर्णन केलेले आहे. ".... दुर्गम जव्हारच्या त्या राणीचा व्याघ्र जो महाराणा, श्रीकृष्णशहा त्यांच्या राजसभे हा मदीय नजराणा."[३२] "टिळकस्तवन" ही कविता सावरकरांनी १९०० साली नाशिक या ठिकाणी लिहिली. त्यात टिळकांचे गुण व किर्ती वर्णन केलेली आहे. "..... स्वार्थास्तव ना केले दृष्कृतिमंडन कदापि तिलकाने, यत्कीर्तिश्रवणामृत दुर्लभ सज्जन सदा चि तिलकाने।। जनसेवेस्तव झटतां झट कारी नेति बाल तिलकाला, दुःसह छळ सोसावा लागे या आर्यभालतिलकाला।। ......"[३३] सावरकरांनी तत्कालीन हिंदुस्थानच्या राजकीय व सामाजिक समस्यांचा वेध घेणाऱ्या कवितांच्या रचना केल्या. त्या कवितांमधूनही सावरकरांनी लोक जागृती व देशप्रेम जागृती करून ब्रिटिश सत्तेचे अन्याय अत्याचार, आणि त्याविरूद्ध लढा देण्याची प्रेरणा देण्याचे प्रयत्न केलेले दिसून येतात. अशा कवितांमध्ये, "गेला आहे देश रसातळाला", "स्वदेशीचा फटका", "दिवाळीचे लक्ष्मीपूजन" बाल विधवा दुःखस्थिती कथन" इत्यादी कवितांचा समावेश करावा लागतो. "गेला अहो देश रसातळाला" ही आठ ओळीची कविता असून त्यात सावरकरांनी परकीय सत्तेकडून होत असलेली देशाच्या लुटीचे वर्णन करताना लिहिले आहे... "गेला अहो देश रसातळाला, स्वातंत्र्य प्रासाद अहा जळाला, आला परांचा अतिथोर घाला, व्हा सज्ज, तुम्हास लुटू निघाला।।"[३४] "स्वदेशीचा फटका" ही साठ ओळींची कविता सावरकरांनी १८९८ साली नाशिक येथे रचिली. त्यात भारतीय जनतेला त्यांनी 'आर्यबंधू' असे संबोधले आहे. आणि त्यांना जागे होण्याचे आवाहन केले आहे. 'आर्य बंधुहो उठा उठा मठासारखे नटा सदा। हटा सोडूनी कटा करू या म्लेंच्छपटा ना धरू कदा।।' आपल्या देशातील आपल्याच कारागिरांनी बनविलेला स्वदेशी माल विकत न घेता लोक परदेशी मालाला कसे भूलतात याचे वर्णन करताना सावरकर लिहितात, ' काश्मीराच्या शाली त्यजुनि अलपाकाला का भुलतां। मलमल त्यजुनि वलवल चित्ती हलहलके पट का वरता?' इंग्रज या देशाची कशी लूट करतात याचे वर्णन करताना सावरकर लिहितात, नेउनि कच्चा माल आमुचा देती साचा पक्व रूपे। आमच्यावरी पोट भरी परि थोरि कशाची तरी खपे।।' परदेशीयांकडून भारताची जी आर्थिक लूट होत आहे ती कशी थांबवावी त्यासाठी आपण प्रत्येकाने काय केले पाहिजे या बाबत सावरकर पुढे लिहितात, 'याला आता उपाय बरवा एकी करवा मन भरवा। ओतप्रोत अभिमानाने हरवा देशी धंदे पट धरवा।।'[३५] "दिपवाळीचे लक्ष्मीपूजन" ही कविता सावरकरांनी १९२५ साली रत्नागिरी येथे रचिली. परदेशी मालावर बहिष्कार घालणाऱ्या प्रचारक मेळ्यासाठी ही कविता केली. दिपवाळीच्या सणात आपण परदेशी माल वापरून आपल्या घरातील व पर्यायाने आपल्या देशातील लक्ष्मी कशी परदेशी पाठवितो, त्यामुळे लक्ष्मी आपणावर कशी रागावते याचे वर्णन केलेले

आहे. 'लक्ष्मीपूजन करू घरोघर आम्ही जरि भावे। प्रसन्न पूजेने ना होता लक्ष्मी रागावे।। आणि इंग्रज पूजी जरी ना लक्ष्मीची मूर्ती। राबे रिद्धीसिद्धी त्यांच्या दाराशी तरि ती।। लक्ष्मी पूजन करावया जै करितो स्नानाला। परका साबू, परकी तेले लावू अंगाला।। ...... साबू नेई कोटि तेल रूपया ने। नेइ लूटोनी विदेश कोटी कोटी अन्य उपायाने।। अशा रितीने लक्ष्मी दवडूनि दाराबाहिरी। लक्ष्मी पूजन करीत बसतो आम्ही देवघरी।।'... 'तरी हिंदुंनो घरात लक्ष्मी आधी आणावी। विदेशीसि ना शिवू शक्य तो वृत्ती बाणावी।। देशी तेले, देशी साबू, देशी वस्त्राने। देशी साखर, देशी अस्त्रे देशी शस्त्राने।। स्वदेश लक्ष्मी पूजू साधुनि जरि मंगल वेळ। गजांत लक्ष्मी हिंदुहिंदुंच्या दारी डोलेल!"[३६]

"अटकेवर जरीपटका" ही कविता सावरकरांच्या 'गोमांतक' या महाकाव्याच्या उत्तरार्धातून घेतलेली आहे. त्या कवितेत मराठ्यांनी अटकेवर जो पराक्रम गाजविला त्याचे वर्णन केलेले आहे. 'संतत शोणित तर्पण धारा धरीत आली पिढी पिढी। हविर्भुजांची रणकुंडातील आग विपल ना विझू दिली! .... आज सात शतकाने विजयी मिरवित सोनरी तोडा। पिई सिंधूचे पाणि पुनररपी हिंदु सैनिकाचा घोडा।।.....'[३७] "हिंदु सुंदरा ती!" ही कविता सावरकरांनी १९०८ साली लंडन येथील वास्तव्यात लिहिली. या कवितेत भारताच्या गतकालातील वैभवचे वर्णन केलेले आहे. त्यात चारी वेद, ऋषिमुनि, राजे महाराजे, शूरवीर, कालिदासांसारखे महाकवि, समाजसुधारक यांना जन्म देणारी आणि त्यांना वाढविणारी अशी ही हिंद सुंदरा म्हणून तिचे गुणगाण गाईलेले आहे. "हिंद सुंदरा ती, वसुंधरा। धन्य प्रसवा ती।।" अशी या कवितेची सुरूवात आहे. .... भरद्वाज जनका। वसिष्ठ शुकसनका, श्रीगर्गा ऋषिवर्गा। अशा जन्मदात्री।।....गार्गेयी विदुला। सीता द्रौपदीला, झाशीच्या लक्ष्मीला। उद्भव दे पोटी।। गौतम चैतन्या। गुरूनानकांना ..... प्रताप शिवबंदा। श्रीगुरू गोविंदा..'[३८] "बालविधवा दुःस्थिती कथन" सावरकरांनी ही दोनशे चार ओळीची कविता १९०२ साली लिहिली. या कवितेत इंग्रजी राजवट, त्यात दुष्काळ, प्लेग सारख्या रोगाची साथ, यांचा त्रास हिंदु जनता कसा सहन करीत होती. याचे वर्णन केलेले आहे. प्लेगच्या साथीत अनेक लोक मृत्यूमुखी पडल्यानंतर बाल विधवांना कसा त्रास सहन करावा लागत होता. याचे वर्णन करताना त्यांनी बालविधवांची समस्या अतिशय प्रभावीपणे मांडली. त्याचबरोबर समाजातील जाणत्या लोकांना या अनिष्ठ रूढींचे बळी ठरणाऱ्या आपल्या मुली बहिणी यांना सोडविण्यासाठी पुढे येण्याचे आवाहन केलेले आहे. 'पाया परवशता ज्या, दुष्काळाच्या शिलांही जो रचिला। अवनति कृतांत केला प्रासाद कळस प्लेग त्या खविला।। ..... केली भयान नगरे, नगरासम दाट सर्व वन वसते। दमले नमले गमले हत सत्वचि मंत्र मंत्र सुनवय ते।।२०।। ..... जाता नाथ स्त्रीचा ती गाईहूनि गाय मानावे। सुटका अबलांची त्या करण्या घेसी नकां यमा नांवे?।। ..... जाता पती अकाली बालेला शून्य दशदिशा होती। माहेरी स्त्री नसली, पुसता मग काय दशा होती।। .... साठीच्या जरठांनो, विधुरांनो, नव वधू खुशाल वरा। लग्नाच्या अष्टदिनी विधवा परि अन्य ना वरो नवरा।। हा न्याय कोण? कां हो विधवा-विधुरात भेद हा असला? कसल्या अपराधांचा अबलांना क्रूर दंड हा बसला? .... वैदिक हो भिक्षुक हो उद्धारक हो अहो सुधारक हो। सदय मनाने कोणी अबलांना संकटात तारक हो।। .... ज्या दीन बालविधवा, द्या त्यांसि पुनर्विवाह-संमतिला। ...... विद्यादाना द्यावे शाला स्थापोनि प्रौढ विधवांते। अज्ञान सुविद्येने नष्टचि अभ्रे अनेकविधवाते।। .... तारायाला माता भगिनी लेकी स्नुषा स्वभावजाया। होईल कोण सिद्ध न अहा! असे मानवी स्वभाव जया?.....'[३९] "सिंहगडाचा पोवाडा" सावरकरांनी १९०५ साली रचिला. हा पोवाडा चौदा चौकांचा आहे. १९०९ च्या सुमारास या पोवाड्यांवर बंदी घालण्यात आली होती. त्यामुळे हे पोवाडे कुणाकडे आढळून आल्यास इतकेच नव्हे तर ते तोंडी म्हणल्यासही शिक्षा होत असे.[४०] "गोमांतक" हे काव्य सावरकरांनी १९२२ साली कारावासात असताना लिहिले. आणि ते १९२४ साली प्रकाशित केले. हे काव्य त्यांनी 'महाराष्ट्र भाट' या टोपण नावाने रचले. हे काव्य पूर्वार्ध व उत्तरार्ध अशा दोन विभागात आहे. पूर्वार्धात ९१२ चरणे तर उत्तरार्ध २६६६ चरणांचा आहे.[४१]

"मॅझिनीचे चरित्र" सावरकरांनी १९०७ साली






लिहिले. भारतातील अनेक तरुणांना या पुस्तकाने स्वातंत्र्य लढ्याची स्फूर्ती दिली. म्हणूनच इंग्रज सरकारने या पुस्तकाच्या प्रकाशनावर १९०८ साली बंदी घातली. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत सावरकरांनी या पुस्तकाविषयी लिहिताना, त्यातून त्यांचे इतिहासविषयक विचार प्रदर्शित होताना दिसतात. तसेच इटलीच्या स्वातंत्र्य लढ्यात जोसेफ मॅझिनी याने बजावलेल्या महत्त्वपूर्ण भूमिकेवरही सावरकर भाष्य करताना लिहितात – '...... नुसती इटली स्वतंत्र होवून काय उपयोग? आपण स्वतंत्र होताच दुसऱ्यांना स्वतंत्र केले पाहिजे.' .... अशा या राष्ट्रीय मंत्राचा मंत्र द्रष्टा जो इटलीचा स्वातंत्र्यदाता देशभक्त मॅझिनी त्याचे आत्मचरित्र व काही राजकीय लेख तरुणांनी वाचणे आवश्यक आहे. या लेखांनी दोन कोटी लोकांना चैतन्य आले.... चातकांनो ही संधी साधून आपापल्या तृष्णा भागवून घेणे हे आता तुमच्या हातात आहे! ....' अशाप्रकारे मॅझिनीच्या चरित्राचे हिंदी लोकांच्या दृष्टीने महत्त्व विषद केले आहे. [४२] स्वदेशीच्या चळवळीची महती पटवून देताना सावरकर पुढे लिहितात की, ".... स्वदेशीची प्रिती ही वाङ्मयात प्रथम प्रादुर्भूत झाली नंतर इटलीमध्ये स्वदेशीची चळवळ सुरू झाली ..... मिलनमध्ये ऑस्ट्रियाच्या तंबाखुवर विद्यार्थ्यांनी कडक बहिष्कार टाकला .... या स्वदेशी चळवळीला लवकरच पूर्ण राजकीय स्वरूप प्राप्त झाले. अमेरिकेतही स्वातंत्र्ययुद्धाच्या आधी अशीच स्वदेशी चळवळ उत्पन्न झाली होती. इतिहासाची पुनरावृत्ती होते ती अशी .... स्वदेशी चळवळ म्हणजे, दुसऱ्याच्या लुटारूपणास आळा घालून आपल्या हक्काचा बचाव करणे होय...." अशा रितीने इतिहासाची पुनरावृत्ती होत असते हे सूत्र सावरकरांनी उदाहरणांसह मांडून स्वदेशी चळवळीचे महत्त्व पटवून देण्याचा प्रयत्न केलेला आहे.[४३]

सावरकरांनी, 'संन्यस्त खड्ग', 'उत्तरक्रिया' इत्यादी नाटकांतूनही ऐतिहासिक घटनांवर प्रकाश टाकलेला असून त्यातून हिंदू जागृती व राष्ट्रप्रेम निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. "संन्यस्त खड्ग" हे नाटक सावरकरांनी रत्नागिरीच्या स्थानबद्धतेच्या काळात लिहिले. या नाटकात बुद्ध, त्यांचा शिष्य, व सेनापती विक्रम इत्यादी पात्र आहेत. या नाटकाच्या माध्यमातून शस्त्राचाराचा प्रचार करण्याचा उद्देश दिसून येतो. कारण या काळात महाराष्ट्रात म. गांधी आणि त्यांची अंहिसावादी भूमिका यांचा प्रभाव वाढत होता. तर शस्त्राविना स्वातंत्र्य मिळणे शक्य नाही ही सावरकरांची भूमिका. त्या भूमिकेला अनुसरून सावरकरांनी शस्त्र महती सांगण्यासाठी हे नाटक लिहिले असावे असे दिसून येते.[४४] "उत्तरक्रिया" हे नाटक सावरकरांनी रत्नागिरी येथे असताना लिहिले. या नाटकात १७६१ साली पानिपतच्या रणांगणावर मराठ्यांचा जो दारूण पराभव झाला, त्याचा सूड पुढे माधवरावांनी घेवून उत्तरेत पुन्हा मराठ्यांचे वर्चस्व निर्माण केले. या कथानकावर हे नाटक बेतलेले आहे. त्यात माधवराव, पहारेकरी, वेडी इत्यादी पात्र आहेत. त्यापैकी वेडीचे पात्र आणि तिचे संवाद अत्यंत महत्त्वाचे असून ती पानिपतावर ज्यांचे बळी गेले त्या सर्वांच्या उत्तक्रियेची, म्हणजे उत्तरेच्या क्रियेची म्हणजेच त्या पराभवाचा सूड घेवून पुन्हा वर्चस्व निर्माण करण्याची जाणीव माधवरावांना करून देते. 'वेडी म्हणते, "कोणा, कोणाची उत्तरक्रिया म्हणून सांगू तुला? अरे, शनिवार वाड्याचा जो धनी आहे. तोच भट बोलाव अणि आमची उत्तरक्रिया कर! तरच आमच्या अंतराळात तळमळणाऱ्या अतृप्त जीवांना उत्तम गती मिळेल' असे पानपती पडलेले सहस्रावधि अतृप्त वीरात्मे माझ्या स्वप्नात येवून ओरडत असतात. ते बघ माझे पतिराज, तो बघ माझा तनय! झुंजत पडले बघ रणांत! ती बघ माझी मुलगी. अग बाईग, घायाळ केली – रक्तभंबाळ केली ना रे त्या राक्षसांनी! त्या माझ्या पतीची, मुलाची, मुलीची .... तुझ्या काकाची, ......!" या वेड्या बाईचे बोलणे ऐकून पुढे माधवराव म्हणतात, "बाओ, तू कोण, कुठली, वेडी आहेस की शहाणी आहेस ते काहीच कळत नाही. पण जर तू खरोखरच वेडी असशील तर तुझे हे वेड या आमच्या पेशवाईतील सगळ्या शहाण्यांच्या शहाणपणाहून अधिक शहाणे आहे यात शंका नाही. निदान ज्या राज्यबुडावू वेडाने आमच्या दादासाहेबांना नि सखारामबापूंना आजकाल पछाडले आहे, त्या वेडापेक्षा जर हे तुझे पानिपतच्या उत्तरक्रियेचे वेड त्यांना पछाडील ना तर किती बरे होईल. ... आता माझे मी सर्व पाहून घेतो. तू निश्चिंत रहा....."[४५]

**सावरकरांची इतिहासविषयक भूमिका**



अनुक्रमणिका

सावरकरांच्या इतिहासविषयक वैचारिक जडणघडणीचा शोध घेताना, 'सर्वसाधारणपणे इतिहास या वाङ्मय प्रकाराचे सावरकरांना बालपणीच मोठे आकर्षण वाटत होते. 'शॉर्ट हिस्ट्री ऑफ दी वर्ल्ड', 'स्टोरीज ऑफ नेशन्स' व 'राष्ट्रकथामाला' या तीन प्रमुख ग्रंथांनी सावरकरांची इतिहास विषयक जिज्ञासा वाढीस लावली होती .... संस्कारक्षम वयातच त्यांच्या हातात पेशव्यांच्या आणि छत्रपतींच्या बखरी पडल्या होत्या. मराठी राजसत्तेबद्दल सादर अभिमान त्या बखरींच्या वाचनाने निर्माण होत होता. या सर्वांची परिणती स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञेत झाली आणि मग पुढील सर्व ऐतिहासिक वाङ्मय याच दृष्टिकोणातून वाचले जावू लागले .... 'सहा सोनेरी पानां'तून आपल्या इतिहास लेखन कार्याचा आढावा घेताना सावरकरांनी लिहिले आहे, "आमच्या शालेय कालातच आम्ही त्यावेळच्या मराठी इतिहासाच्या विस्तृत पण विस्कळीत पसाऱ्यावर हिंदुराष्ट्र दृष्टीच्या विद्युल्लतेचा प्रकाशझोत टाकताच आमचे मनही प्रकाशमय झाले." इतिहासाकडे पाहण्याचा एक विशिष्ट ध्येयाधिष्ठित दृष्टिकोण महाविद्यालयीन शिक्षणाच्या काळातच सिद्ध झाला.... असे मत प्र. ल. गावडे व्यक्त करतात. [४६] सावरकरांनी लिहिलेल्या सर्व इतिहास वाङ्मयाचे स्वरूप 'हिंदुराष्ट्र दृष्टिकोणातूनच लिहिले आहे.'[४७]

स्वा. सावरकरांनी जे विविध प्रकारच्या साहित्याची रचना केली त्यावर सावरकरांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध पैलूंचा प्रभाव पडल्याचे त्यांच्या साहित्यातून स्पष्टपणे दिसून येते. ".... त्यांच्यातील स्वतंत्र्यनिष्ठा ही सर्व इतिहास ज्वलंत आणि जिवंत करते.... त्यांचा बुद्धीवाद हा मूळच्या घटनांचे सत्याधिष्ठित व प्रामाणिक समीक्षण करण्यास त्यांना कारणीभूत होतो. त्यांची संशोधकवृत्ती हिंदुत्वानुकूलघटितांचे अर्थ उलगडून दाखविते. .... मानवहितदृष्टी आणि व्यवहारवाद, शस्त्र सामर्थ्यावरील अढळ निष्ठा, हौतात्म्यवृत्तीचे आकर्षण, प्रतिशोध घेण्याची प्रवृत्ती आणि रागद्वेष यातून सिद्ध झालेले ठाम राजकीय सिद्धांत आणि प्रचारकी वृत्ती इत्यादी सर्व व्यक्तिविशेष आपले अस्तित्व प्रकट करताना आढळतात. असे मत प्र. ल. गावडे व्यक्त करतात.[४८]

सावरकरांनी भारताच्या इतिहासातील विविध घटनांचा उपयोग वर्तमानातील समस्या सोडविण्याच्या व त्यांच्याविषयी जागृती करण्याच्या दृष्टिकोणातून केलेला दिसून येतो. याबाबत प्र. ल. गावडे असे लिहितात की, इतिहासाचे प्रभावी साधन देशाभिमानाचा, राष्ट्रजागृतीचा स्फुलिंग पेटविण्यासाठी वापरले आहे, हे खरे आहे. ..." ".... इतिहास या साधनांचा उपयोगही स्वदेशाभिमानाची भावना गदगदून हलविण्यासाठी त्यांनी केला. हा इतिहास लिहिताना 'गुलामी देशात गुलामी वृत्तीच्या मगरमिठीतून देशाची सुटका केली पाहिजे व स्वदेशाच्या इतिहासातील उत्कट व भव्य असेल त्यावर तरुण पिढीची नजर खिळली पाहिजे इकडे सावरकरांचे लक्ष होते.'[४९] इतर इतिहासकारांशी सावरकरांची तुलना करताना प्रा. रा. वि. ओतूरकर लिहितात की, "सावरकर म्हणजे .... रियासतकार सरदेसाई नव्हेत ... प्रज्ञावंत राजवाडे नव्हेत.... वंगवासी जदुनाथ सरकार नव्हेत, ... टॉयन्बी नव्हेत; पण या पैकी एकालाही इतिहासाचे साधन वापरून कधी करता आले नाही असे कार्य सावरकरांनी केले आहे व ते म्हणजे धगधगत्या राखेतून देशाभिमानाचा स्फुलिंग पेटवावयाचां, झोपलेल्यांना खडबडून जागे करावयाचे, देशाभिमानाच्या भावनेस गदगदा हलवून ती महाराष्ट्रात उभी करण्यासाठी इतिहासाचा वापर करणारात महाराष्ट्रातच काय पण उभ्या हिंदुस्थानातही सावरकरांएवढा थोर पुरुष झालेला नाही." या शब्दात सावरकरांच्या ऐतिहासिक कामगिरीची महती व्यक्त केली आहे. [५०]

सावरकरांनी आपली ऐतिहासिक कविता तात्कालिकाच्या संदर्भात व देशभक्तीच्या, स्वातंत्र्य भावनेच्या प्रचारार्थ लिहिली.'[५१] सावरकरांच्या पोवाड्यांविषयी य. न. केळकर असे मत व्यक्त करतात की, "सावरकरांनी पोवाडे रचले तेव्हा त्यांच्या डोळ्यापुढे त्यांनी योजलेल्या कार्यासाठी लोकांत चैतन्य आणून त्यांना कार्यप्रवण करणे हाच हेतू होता."[५२]

सावरकरांच्या लेखनातून त्यांचे इतिहास लेखनाबाबतचे विचार स्पष्टपणे दिसून येतात. इतिहास लेखन ही बाब प्रामुख्याने वस्तुनिष्ठ स्वरूपाची असली तरी सावरकरांच्या इतिहास लेखनात ते व्यक्तिनिष्ठ बनून त्यांच्या आत्मविष्काराचे साधन बनलेले दिसते. त्यामुळेच

अनुक्रमणिका

त्यांच्या इतिहासविषयक लेखनावर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटल्याचे दिसून येते. याबाबत प्र. ल. गावडे असे लिहितात की, '....सावरकरांचे व्यक्तिमत्त्व मुळात आक्रमक स्वरूपाचे. तेव्हा त्यांच्या इतिहासवाङ्मयावर त्यांच्या मननाचे व मतांचे रंग अगदी ठसठशीतपणे उमटले नाही तरच नवल. ....'[५३] सावरकरांनी लिहिलेले इतिहासविषयक लेखन हे हिंदुराष्ट्रदृष्ट्या केलेले असल्याने इतिहास लिहिताना आपल्या देशाचा अभिमान व वैभव याकडे लक्ष देवून इतिहास लिहिला पाहिजे असा आग्रह ते धरताना दिसतात. सहा सोनेरी पानांमध्ये सावरकर पौरस आणि सिंकदर यांच्या प्रसंगाबाबत व सिकंदराला जिंकायला जग उरले नाही या कथेबाबत म्हणतात, '... जनमताची दिशाभूल करणारा इतिहास व दंतकथा लिहू नयेत.....'[५४] सावरकरांच्या भूमिकेबाबत प्र. ल. गावडे, 'सावरकर एक चिकित्सा' या ग्रंथात असे लिहितात की, '.... सावरकरांचे असे स्पष्ट सांगणे आहे की, असा विपरीत समज होवू नये म्हणून इतिहास लेखकांनी मुसलमानांच्या स्वाऱ्या, त्या त्या काळी हिंदुंनी केलेला यशस्वी प्रतिरोध... प्रतिकार यांचा स्पष्ट ठसा वाचकांच्या मनावर बिंबेल इतक्या .... ठळकपणाने त्या त्या घटना वर्णिल्या पाहिजेत.[५५] भूतकाळातील ऐतिहासिक सत्य सांगताना इतिहासकाराने कोणती दृष्टी स्वीकारली पाहिजे याचे स्पष्टीकरण करताना.... भूतकाळातील व्यक्तिच्या कृत्यांच्या हेतूविषयी अतिशयोक्ती, अन्योक्ती किंवा विपर्यास करून अर्थ लावला जाता कामा नये.'[५६] सावरकरांच्या इतिहासविषयक लेखनातून काव्यात्मक शैली दिसून येते त्याबाबत '.... उत्कट भावनेच्या नैसर्गिक काव्यमय भाषेतच इतिहास लिहावा' असे सावरकर आग्रहाने सांगतात. त्यामुळेच त्यांच्या लिखाणातील रूक्ष ऐतिहासिक घटना काव्यरूप धारण करताना दिसतात. उदा. ५७ च्या क्रांतीचा प्रसार करणाऱ्या त्या गव्हाच्या बाजरीच्या पिठाच्या चपात्या त्यांना एखाद्या क्रांतीच्या देवदुतासारख्या वाटू लागतात.....'[५७] इतिहास लिहिताना तो अगदी सत्यनिष्ठ लिहावा. वर्तमानकाळावर होणाऱ्या परिणामांची चिंता करू नये. तसेच इतिहास लिहिताना पक्षपाती भूमिका स्वीकारू नये. हिंदुसंघटकांनी आपल्या राष्ट्राचा इतिहास कसा लिहावा नि कसा वाचावा या निबंधात सावरकर लिहितात, '... कोणी इतिहास लेखक वैदिक धर्माचा अभिमानी असेल. पण म्हणून त्याने पूर्वीच्या इतिहासातील आपल्या अवैदिक बुद्ध वा जैन धर्मियांशी वैदिक धर्मियांच्या काही वेळा झालेल्या विग्रहाचे वर्णन केवळ वेदिकांचीच बाजू उचलून धरण्यासाठी पक्षपाताने करू नये किंवा तसे विग्रह आपापसात काही वेळा झाले असे लपवूही नये..... किंवा आपल्या इतिहासातील दोषस्पद किंवा पराभवाचे, यादवीचे वत्तांत लिहिताना ते गाळण्याचा मोह आवरावा. ज्या काळात जी वस्तुस्थिती असेल ती जशीच्या तशीच लिहावी..'[५८] हिंदु राष्ट्राचा इतिहास वाचताना कोणती काळजी घ्यावी याबाबत सावरकर याच निबंधात पुढे लिहितात,'.... भूतकाळातील कोणत्याही घटनेची चिकित्सा करताना वर्तमानकालाचे उपनेत्र लावून करू नये.... त्या काळाच्या परिस्थितीच्या प्रकाशात त्या निरिक्षाव्यात.[५९] इतिहासाच्या परिशिलनाबाबत सावरकर पुढे लिहितात की, '.... मागच्या इतिहासातील घटनांना उल्लेखितानासुद्धा काळजी अवश्य घ्यावी की, आमच्या आपसातील कलहाचा कोळसा पुन्हा पुन्हा उगाच उगाळत बसण्याचे शक्यतो टाळावे.'[६०] 'मतखंडन' हा एक विशेष पैलू सावरकरांच्या इतिहासविषयक लेखनातून जाणवतो. याबाबत प्र. ल. गावडे लिहितात, '...कासमच्या सिंधवरील आक्रमणापासून तो थेट इंग्रजांच्या हातून राजसत्ता जाईपर्यंत हजार वर्षे हिंदू हे परदास्यात खितपत आलेले आहेत, असे निव्वळ खोटे व हिंदूंना अपमानकारक असलेले उल्लेख इतिहासातून मुळासकट खोडून टाकले पाहिजेत असे सावरकर आग्रहाने सांगतात. ....' सहा सोनेरी पानांतील उल्लेखांच्या आधारे प्र. ल. गावडे लिहितात की, हिंदुस्थानचा इतिहास म्हणजे पराभवांमागून पराभवांची मालिका आहे असा अपमानकारक आरोप देशी आणि विदेशी लोकांकडून केला जातो. त्याचे खंडण करण्यासाठी सावरकरांनी ६०० ते इ. स. ७०० पर्यंतचा सुदीर्घ कालखंडातील इतिहासाचा मागोवा घेताना, शक, यवन, हूण इत्यादी शत्रूंच्या आक्रमणांनी हिंदू जाती नामशेष न होता उलट त्यांच्यावरच विजय मिळवून त्यांचे अस्तित्व काय पण त्यांचे 'नाम' सुद्धा 'शेष' उरू दिले नाही. असे सोदाहरण सिद्ध केले.[६१]

अनुक्रमणिका

**निष्कर्ष :–**

वरील माहितीच्या आधारे असे दिसून येते की, स्वा. सावरकरांनी आपले विचार व उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी इतिहासाचा उपयोग करून घेतला. त्यांनी केलेल्या ऐतिहासिक ग्रंथ, निबंध, काव्य इत्यादी विविध प्रकारच्या साहित्यातून भारतीय इतिहासाचा मोठ्या प्रमाणात वापर केला. त्यांनी केलेल्या इतिहासाच्या मांडणीत प्रामुख्याने हिंदुस्थानचा गौरवशाली इतिहास, शूरवीरांचे पराक्रम, आणि विशेष करून मराठ्यांचा इतिहास यांचा समावेश होतो. स्वाभिमान व देशभक्तीची प्रेरणा जागविण्यासाठी, पारतंत्र्यातून मुक्ती मिळविण्यासाठी इटली, तुर्कस्थान, अमेरिका इत्यादी देशातील घडामोडींचे उल्लेखही त्यांच्या लेखनातून दिसून येतात. सावरकरांच्या इतिहास लेखनाच्या प्रक्रियेत त्यांनी इतिहास लेखनाबाबत जे विचार मांडले त्यातून त्यांचे इतिहासाचे तत्त्वज्ञान प्रकट होताना दिसते. आधुनिक इतिहासलेखनातील प्रवाह, इतिहासाचे तत्त्वज्ञान व भूमिका विचारात घेता सावरकरांचे इतिहास लेखन–विषयक विचार आजच्या काळात जसेच्या तसे लागू होतील असे वाटत नाही परंतु ज्या काळात व ज्या परिस्थितीत त्यांनी आपले विचार मांडले, काही बाबतीत आग्रही प्रतिपादन केले ते त्यांच्या दृष्टीने योग्यच होते असे वाटते.

**संदर्भ सूची**

१ - प्र. ल. गावडे, वि. दा. सावरकर: एक चिकित्सक अभ्यास, पृ. २१२-२१३
२ - कित्ता.
३ - कित्ता, पृ. १९३-१९५
४- कित्ता, पृ. १९७
५- कित्ता, पृ. २०२
६- कित्ता, पृ. २०५
७- कित्ता, पृ. २०८
८- कित्ता, पृ. २०५-२०६
९- कित्ता, पृ. २०७
१०- कित्ता, पृ. २१४
११- स्वा. सावरकर, रणशिंग, प्रस्थावना, पृ. ७–१२
१२- कित्ता, पृ. १५-१६
१३- कित्ता, पृ. २३
१४- कित्ता, पृ. २५-२६
१५- कित्ता, पृ. २७
१६- कित्ता, पृ. २८
१७- कित्ता, पृ. ३७-३८
१८- कित्ता, पृ. ३८-३९
१९- कित्ता, पृ. ४१
२०- कित्ता, पृ. ४७
२१- कित्ता, पृ. ४८-५१,५५,६३
२२- कित्ता, पृ. ६७, ६८, ६९-७०, ६६
२३- कित्ता, पृ. ७६
२४- कित्ता, पृ. ७४-७५
२५- कित्ता, पृ. ७७
२६- कित्ता, पृ. ७८-७९, ८१
२७- कित्ता, पृ. वा. गो. मायदेव – सं. सावरकरांची कविता, पृ. २२–२३
२८- कित्ता, पृ. ३३
२९- कित्ता, पृ. ४५-४६
३०- कित्ता, पृ. १४२-१४३
३१- कित्ता, पृ. ४७-५७
३२- कित्ता, पृ. ३
३३- कित्ता, पृ. ६३-६५
३४- कित्ता, पृ. १३
३५- कित्ता, पृ. ९
३६- कित्ता, पृ. ६–९
३७- कित्ता, पृ. १८७–१८८
३८– कित्ता, पृ. १८२ –१८४
३९- कित्ता, पृ. ६५ – ६६
४०- सावरकर, समग्र सावरकर वाङ्मय, खं. ७ पृ. ५२ – ५४, समग्र सावरकर वाङ्मय प्रकाशन समिती, महाराष्ट्र प्रांतिक हिंदुसभा, पुणे, प्रथम आवृ. १९६५.
४१- कित्ता, पृ. ३५ – ४४
४२- भा. द. खेर, सं., सावरकर साहित्य नवनीत, पृ. ३४
४३- कित्ता, पृ. ४० – ४१
४४- कित्ता, पृ. १३५

४५- कित्ता, पृ. १९३ – १९६
४६- प्र. ल. गावडे, वि. दा. सावरकर : एक चिकित्सक अभ्यास, पृ. १९७
४७- कित्ता
४८- कित्ता, पृ. १९९ –२००
४९- कित्ता, पृ. २०१, २११
५०- कित्ता, पृ. २११ – २१२
५१- कित्ता, पृ. ३९५
५२- कित्ता, पृ. ३९७
५३- कित्ता, पृ. १९६
५४- कित्ता, पृ. १९७ – ९८
५५- कित्ता
५६- कित्ता, पृ. १९९ – २००
५७- कित्ता, पृ. २१५
५८- कित्ता, पृ. ६९ – ७०, ७१
५९- कित्ता, पृ. ७६
६०- कित्ता, पृ. ७७
६१- कित्ता, पृ. २०२ – २०३

---



अनुक्रमणिका







## काल, आज आणि उद्या
# मार्क्सचे इतिहासाविषयीचे सिद्धान्त
— साक्षी

चिद्‌वाद (आयडिॲलिझम्) आणि जडवाद (मटीरियलिझम्) या तत्त्वज्ञानातील सनातन विचारप्रणाली आहेत. या दोहोतील मतभेदाचा मूळ मुद्दा मनुष्याच्या अनुभवाला येणाऱ्या वास्तवाचे अंतिम रूप काय आहे, हा आहे. या मूळ रूपाचे त्यांना (या मतप्रणालींना) जे आकलन झाले आहे त्यावर त्या प्रणालींची पुढील विवेचने ठरतात. चिद्‌वादी असे सांगतात की माणसाला त्याच्या मनातील घटनांचेच फक्त आकलन होते; तर जडवादी मानतात की, भौतिक जग हेच अंतिम वास्तव आहे. त्याचा अनुभव मनुष्याला साक्षात् रूपात येत नाही; मनाच्या माध्यामातूनच येतो; पण तेवढ्याने भौतिक जग व त्याचे गुणधर्म यांच्या अस्तित्वाविषयी शंका घ्यावी अशी स्थिती नाही. मार्क्स व एंगल्स या दोघांचेही असे प्रतिपादन होते की, आपला भौतिक जगाशी जो व्यापार चालतो– म्हणजे आपण वस्तू घडवतो, सृष्टीतील द्रव्यांवर प्रयोग करतो इ.– त्यातून आपल्याला भौतिक जगाचा प्रत्यय येतो. या प्रत्ययाच्या पायावर आपण आपले सिद्धान्त रचू शकतो. चिद्‌वादी भौतिक जगाचे अस्तित्व अमान्य करीत नाहीत; पण, भौतिक जगच अंतिम आहे किंवा मनुष्याला जगाच्या पलीकडील कशाचे ज्ञान असत नाही, असे चिद्‌वादी मान्य करीत नाहीत.

बारों घोलबाख् या विचारवंताने, अठराव्या शतकात, जडवादाला सामाजिक वास्तवाची जोड दिली. घोलबाख्चे असे म्हणणे होते की, व्यक्ती ही तिच्या भोवतीच्या सामाजिक पर्यावरणातून घडत असते. जगातील दुष्टाव्याचे मूळ मनुष्याच्या स्वभावात नाही किंवा मनुष्याच्या अस्तित्वावर आपापतः जी बंधने आली आहेत त्यातही नाही; समाजातील रिवाज व सामाजिक संस्था यांच्यामुळे दुष्टपणा उद्‌भवतो. जर आपण हे रिवाज आणि बंधने घालणाऱ्या संस्था नाहीशा करू शकलो तर जगात आनंदाचे उधाण आलेले दिसेल. व्यक्तीला समाजाचा लळा लागणे हा शिक्षणाचा व्यापक अर्थ घेतला तर तशा शिक्षणाचा योग्य उपयोग करून आपल्याला चांगली माणसे व त्यांच्या द्वारा चांगले जग निर्माण करता येईल. जडवादी विचाराच्या कक्षेत सामाजिक वास्तवाचा समावेश करावा, हा घोलबाख्चा विचार मार्क्सला पटत होता. पण 'शिक्षणातून माणूस घडवणे' हा एकांगी कार्यकारण भाव आहे, असे मार्क्सला वाटत होते. एखादा शिल्पकार दगडावर छिन्नी चालवून मूर्ती घडवितो, त्याप्रमाणे समाजाकडून व्यक्तीला आकार दिला जातो, हे मार्क्सला मान्य नव्हते. कार्यकारण भावातील द्वंद्व–विचार आपण मागे पाहिला आहे. (नवभारत, एप्रिल,२००९) त्यानुसार समाजाचा व्यक्तीवर परिणाम होतोच; पण मनुष्याला स्वतंत्र विचारशक्ती व स्वातंत्र्याची ओढ असल्यामुळे समाजाचे दडपण आणि व्यक्तीचे स्वातंत्र्य यांच्यातील घर्षणातून व्यक्ती घडत जाते. मार्क्सच्या विचाराप्रमाणे 'स्वातंत्र्य कशापासून' या पेक्षाही 'स्वातंत्र्य कशासाठी' हा विचार जास्त महत्त्वाचा. त्यामुळे व्यक्तीचे स्वातंत्र्य हे तिने समाजाने (विकासाचे) जे पर्याय मोकळे ठेवलेले असतात त्यापैकी पाहिजे तो पर्याय निवडण्यासाठी वापरायचे असते.

मार्क्सच्या जडवादाला केवळ राजकीय व नैतिक पैलूच होते असे नाही. जडवादाचा उपयोग करून मार्क्सने इतिहासाविषयीचा आपला सिद्धान्त रचला. त्याचा विचार आपल्याला करावयाचा आहे.

(१)

मार्क्सने इतिहासाविषयी मांडलेला सिद्धान्त त्याने स्वीकारलेला जडवाद व द्वंद्वात्मक आकलन (डायलेक्टिक्स) यांना धरूनच होता. माणसे त्यांच्या पर्यावरणाच्या, विशेषतः आर्थिक पर्यावरणाच्या, योगाने घडतात, हे स्पष्टच आहे. पण माणसे व समाज बदलतो कशामुळे, समाजाचे परिवर्तन, उदा. सरंजामशाहीतून भांडवलशाहीत किंवा भांडवलशाहीतून समाजवादी समाजात, कसे होते याचे विवेचन करणे अधिक गरजेचे

अनुक्रमणिका

आहे.

मार्क्सने त्याच्या 'क्रिटिक ऑफ पोलिटिकल इकॉनॉमी' या प्रबंधात म्हटले होते, समाजाच्या उत्पादन व्यवस्थेत भाग घेताना माणसा–माणसात काही विशिष्ट संबंध निर्माण होतात. हे संबंध अनेकदा त्या मनुष्यांच्या इच्छेविरुद्ध व अटळपणे घडून येतात. उत्पादन व्यवस्थेमुळे घडून येणारे हे संबंध व समाजाची उत्पादनाची साधने यांच्यात काही संगती असते. उत्पादन व्यवस्थेमुळे माणसा--माणसात घडून आलेल्या संबंधांचा एकत्रित विचार केला म्हणजे समाजाची अर्थव्यवस्था स्पष्ट होते. या अर्थव्यवस्थेच्या पायावर कायदे-कानू, राजकीय व्यवस्था यांची बांधणी होते. समाजाची वैचारिक धारणा किंवा सामूहिक जाणीव (कॉन्शसनेस्) ही या कायदा व राज्यव्यवस्था यांना धरून चालणारी असते.'

इथे 'अर्थव्यवस्था' या शब्दाने मार्क्सला त्या समाजातील वस्तूंची सौदेबाजी, व्याजाचे दर, खेळत्या पैशाची रक्कम या गोष्टी अभिप्रेत नाहीत. मागील लेखात (नवभारत, एप्रिल२००९) आपण पाहिले होते की, मार्क्स रूपे (किंवा स्थिती) आणि सत्त्व यांच्यात भेद करतो. जांभळाचे हिरवा, तांबडा, जांभळा, काळा हे बदलते रंग ही रूपे आहेत व जांभुळपण हे सत्त्व आहे. तसे व्याजाचे दर, समाजाची एकूण बचत, खेळता पैसा ही अर्थव्यवस्था या सत्त्वाची रूपे आहेत. पण अर्थव्यवस्थेचे सत्त्व म्हणजे उत्पादनासाठी तंत्रज्ञान, साधने व माणसे यांची जी सांगड विशिष्ट समाजात, एका विशिष्ट काळी घातलेली असते, ती होय. ही जी सांगड बसलेली असते त्यानुसार उत्पादन व्यवस्थेत गुंतलेल्या माणसा-माणसातील संबंध ठरतात. लेथ सारखे यंत्र आणि नांगर ओढणारा बैल ही उत्पादनाची साधने आहेत. त्यांना मार्क्स आर्थिक जातीचा (इकॉनॉमिक कॅटेगरी) दर्जा देत नाही. पण कारखाना घ्या; तिथे यंत्राचा उपयोग उत्पादनासाठी केला जातो व कारखान्यात काम करणारी माणसे सामूहिक उत्पादनाच्या क्रियेतून एकामेकांच्या संबंधात येतात. म्हणून कारखान्याला मार्क्स आर्थिक जातीचा (इकॉनॉमिक कॅटेगरी) दर्जा देतो.

मार्क्सने अर्थव्यवस्थेला 'पाया' व 'न्याय-राज्य-व्यवस्थेला 'डोलारा' (सुपर स्ट्रक्चर) म्हटले आहे. त्यावरून असा समज होऊ शकतो की, 'पाया' हे कारण आहे व 'डोलारा' हे कार्य आहे. पण आपण पाहिले आहे की, मार्क्स 'कारण— कार्य' संबंध एकतर्फी, म्हणजे कारणावरून कार्याचा अंदाज येतो, अशा स्वरूपाला, मानत नाही. 'कारण व कार्य' यांच्यात द्वंद्वात्मक म्हणजे परस्परांवर परिणाम करणारा संबंध असतो. त्यामुळे अर्थव्यवस्थेला अनुरूप अशी 'कायदा व राज्यव्यवस्था' घडत असतात, कायदा व राज्यव्यवस्थेच्या योगाने अर्थव्यवस्थेतही परिवर्तन होत जाते. 'अर्थव्यवस्था' व 'कायदा' आणि राज्यव्यवस्था' यांच्यातील कार्य–कारण-संबंध दुहेरी असतो असे मानावयाला मार्क्सच्या विचार-चौकटीत आणखी एक कारण आहे. 'कायदा व राज्यव्यवस्था' ही अर्थव्यवस्थेशी पूर्णपणे निगडित असतील; 'कायदा व राज्यव्यवस्था' यांचा पायाभूत अर्थव्यवस्थेवर काहीच परिणाम होत नसेल; तर सरंजामदारी, भांडवलशाही, समाजवाद यांचे कालखंड परस्परांपासून पूर्ण तुटलेले व स्वतःची बंदिस्त रचना असणारे, असे होतील. एका कालखंडातून दुसऱ्या कालखंडात संक्रमण कसे होते, हे प्रतिपादण्याचा मार्क्सचा जो मूळ हेतू आहे त्याला अशा प्रकारच्या प्रारूपात स्थानच राहाणार नाही.

इतिहासाच्या एका कालखंडातून दुसऱ्या कालखंडाकडे संक्रमण होणे म्हणजेच इतिहास विकासाच्या दिशेने उलगडत जाणे याचा खुलासा करताना मार्क्सला एका कालखंडात वावरणाऱ्या उत्पादक शक्ती आणि त्याच कालखंडात उपस्थित असणारी समाजव्यवस्था यांच्यातील बेबनावामुळे संक्रमण होते, असे दाखवायचे होते. मार्क्स म्हणतो, 'उत्पादक शक्तींचे स्वरूप बदलू लागते तेव्हा ज्या 'कायदा व राज्यव्यवस्था' यांच्या चौकटीत त्या उत्पादक शक्ती इतका काळ कार्य करीत होत्या, ती चौकट त्या शक्तींना जाचक वाटू लागते. मग समाजात क्रांतिकारक बदल होण्याची वेळ येते. अर्थव्यवस्थारूपी पायामध्ये बदल घडल्यामुळे त्या पायावर उभा असणारा 'कायदा व राज्यव्यवस्था' यांचा डोलारा गदगदा हलवला जातो व त्यातही परिवर्तन घडून येते. अशा स्वरूपाच्या बदलाचा विचार करताना आपल्या दोन पातळ्यांवरील परिवर्तनात भेद करावा

लागतो. उत्पादन-व्यवस्था ज्या आर्थिक परिस्थितीत कार्य करत होती त्या आर्थिक परिस्थितीत घडणारे फेरबदल, हे पहिले परिवर्तन. हे परिवर्तन आपणास वस्तुनिष्ठ भाषेत सांगता येते. पण (त्या पहिल्या परिवर्तनाच्याच संगतीने) कायदे, राज्यव्यवस्था, धर्म, तत्त्वज्ञान, सौंदर्याची संकल्पना इत्यादी संकल्पनात्मक विचारव्यूहातही परिवर्तन घडून येते, ही परिवर्तनाची दुसरी भूमी (साईट) होय. माणसा-माणसातील संघर्ष हा या दुसऱ्या भूमीवर घडून येतो.

एंगल्सने म्हटले आहे, 'माणसांना अंतिम सत्ये व न्याय यांचा काही नवा साक्षात्कार झाला व त्यामुळे त्यांनी समाजरचनेत बदल केले व राज्यक्रांती घडवून आणली, असे होत नसते. समाजातील बदल व राज्यक्रांती यांच्या उगमाचा शोध उत्पादन व्यवस्था व वस्तुविनिमय यात जो फरक पडतो त्यात घेतला पाहिजे; तत्त्वज्ञानातील बदलाने नव्हे तर अर्थव्यवस्थेतील बदलांमुळे सामाजिक व राजकीय परिवर्तन घडून येते. लोकांना जेव्हा वाटू लागते की, विद्यमान सामाजिक संस्था या विवेकहीन आणि अन्यायकारक आहेत, विवेकी विचार अस्थानी ठरत आहेत आणि सदाचार हा पाप म्हणून गणला जाऊ लागला आहे तेव्हा अशी खूण गाठ बांधावी की, उत्पादनव्यवस्था व वस्तुविनिमय यांच्यात बदल होत गेला आहे; जी समाजव्यवस्था (आता कालबाह्य झालेल्या) अर्थव्यवस्थेला अनुकूल ठरावी म्हणून रचली होती ती नव्या अर्थव्यवस्थेला अनुरूप अशी नाही. समाजव्यवस्थेतील अन्याय दूर करण्याची साधने जी शोधायची ती देखील नवीन उत्पादन व्यवस्थेतच शोधावी लागतील. याचाच अर्थ असा की, ही साधने काही आपल्या मनाने तयार करायची नाहीत; तर नवीन अर्थव्यवस्थेतून ती हुडकून काढायची आहेत.' थोडक्यात सांगायचे तर एका कालखंडात जे उत्पादन तंत्र उपस्थित असते त्या तंत्रज्ञानाने माणसांना काही पर्याय उपलब्ध करून दिलेले असतात. त्या पर्यायांचा फायदा घेऊन विशिष्ट समाजाची रचना झालेली असते. तंत्रज्ञानाचा विकास झाला की, पूर्वीच्या तंत्रज्ञानाला धरून उभी राहिलेली समाजरचना जाचक व अन्याय्य वाटू लागते. (आता कालबाह्य झालेल्या) जुन्या समाजरचनेचे पक्षपाती एका बाजूला आणि तंत्रज्ञानातील सुधारणांमुळे समाजरचना अधिक सुविहित बनविण्याची शक्यता निर्माण झाली आहे, असे मानणारे लोक दुसऱ्या बाजूला असा संघर्ष निर्माण होतो. जे आजवर न्याय्य म्हणून स्वीकारले गेले ते आता न्याय्य मानले जात नाही. सध्याच्या अस्वस्थतेला 'उत्तर' म्हणून सुधारणावाद्यांनी सुचविलेला प्रस्तावच नवीन संघर्षाचे कारण बनतो. मार्क्स सांगतो की, 'संक्रमणाच्या प्रक्रियेचा सखोल अभ्यास केला तर असे ध्यानात येते की, जेव्हा उत्तराला अनुकूल अशी स्थिती निर्माण झालेली असते किंवा निर्माण होऊ घातलेली असते, तेव्हा प्रश्न लोकांच्या समोर येतो; उत्तराच्या उपस्थितीमुळेच प्रश्न निर्माण होतो!'

(२)

वर आपण पाहिले की, तंत्रज्ञानाला अनुरूप अशी उत्पादन व्यवस्था; उत्पादन व्यवस्थेला अनुसरून निर्माण झालेली अर्थव्यवस्था; व अर्थव्यवस्थेच्या पाठीवर रचलेला कायदा आणि राज्यव्यवस्थेचा डोलारा असे प्रारूप मार्क्सने उभे केले आहे. एका कालखंडातून (उदा. सरंजामशाही) दुसऱ्या कालखंडाकडे (उदा. भांडवलशाही) संक्रमण होताना जी प्रक्रिया घडते तिचे वर्णन आता करावयाचे आहे. परिस्थितीच्या प्रभावामुळे मनुष्यांच्या मनात काही कल्पना वावरू लागतात (इथे आपणास 'जडवादा'चा आढळ होतो.) या कल्पना माणसांना परिस्थिती बदलण्याची हालचाल करण्यास भाग पाडतात. (कल्पनांच्या उगमांशी झालेला द्वंद्वात्मक संघर्ष.) एंगल्स सांगतो की, 'ज्यांच्यामुळे मनुष्य कार्यप्रवण होतो त्या सर्व गोष्टी मनुष्याच्या मेंदूतून त्याच्यापाशी पोचतात' आणि 'काही संकल्प असल्याखेरीज आणि उद्दिष्ट असल्याखेरीज काहीच घडून येत नाही.' परंतु एंगल्स असे मानत नव्हता की, अमुक एका परिस्थितीत अमुक एका प्रकारच्या कल्पनाच मनुष्याला हटकून सुचतील. एंगल्स असे सांगत असे की, मनुष्याला सुचणाऱ्या कल्पनांचे मूळ निरनिराळ्या गोष्टींपर्यंत भिडवता येते. अनुभवाला येणारी सृष्टी, आदर्शाची ओढ, महत्त्वाकांक्षा, सत्य व न्याय यांच्या विषयीची आस्था, असूया आणि केवळ लहरीपणा अशा अनेक गोष्टींपासून कल्पनांची सुरूवात होऊ शकते. मार्क्सही असेच मानत असे की, अमुक मनुष्याला अमुक कल्पना सुचते तेव्हा

त्या कल्पनेचा उगम त्याच्या वैयक्तिक भावविश्वातही सापडणे शक्य असते. त्याला स्मरत असणारे प्रसंग, त्याचे वैयक्तिक राग–लोभ, आशा आणि भीती, पूर्वग्रह आणि समजुती, आपुलकी व दुरावा अशा अनेक भावना-विचारांनी माणसाचे भावविश्व खचाखच भरलेले असते.

एंगल्स व मार्क्स, दोघेही, मनुष्याला स्वतंत्र इच्छा-शक्ती आहे, असे मानत असत. परंतु इतिहास हा मनुष्यांच्या इच्छा–शक्तीने निर्मिलेली उद्दिष्टे सिद्ध करण्यासाठी घडून येतो, असे नाही. प्रत्येक व्यक्तीचे ईप्सित तिच्या पुरते असते व ईप्सित सिद्ध होण्यास इतरांच्या इच्छाशक्तीचा अडथळा येतो. शेवटी जे काही घडून येते ते कोणीच इच्छिलेले नसते. सिद्धान्त हा काय घडू शकेल ते वर्तवतो; कोण्या व्यक्तीची काय इच्छा आहे, याच्याशी त्याला देणे–घेणे नसते. काय घडून येते त्याचा अभ्यास केल्यास आपल्याला कळून येते की, जे काही घडते ते घडण्यामागे काही अपरिहार्यता किंवा अटळपणा होता. या दृष्टिकोणातून पाहिल्यास कोण्या व्यक्तीच्या, मग ती कितीही महत्त्वाची वा मोठी असो, काय आकांक्षा होत्या यांचा विचार हा किरकोळ ठरतो. संपूर्ण जनसमुदायाला कार्योन्मुख व्हावयाला लावणाऱ्या ज्या प्रेरणा असतात आणि समुदायाच्या प्रेरणा असल्यामुळेच ज्या प्रत्येक व्यक्तीच्या प्रेरणा बनतात त्या प्रेरणांचे विश्लेषण करणे महत्त्वाचे ठरते. दुसरे असे की, अशा प्रेरणा क्षणभंगुर किंवा एखाद्या वणव्यासारख्या घटकेत भडका उडवून शांत होणाऱ्या असून चालत नाही. या प्रेरणा दीर्घकाळ कार्यान्वित राहून फार मोठे ऐतिहासिक संक्रमण घडवून आणणाऱ्या असतात. इतिहासाला वळण देणाऱ्या ज्या शक्ती असतात त्यांच्या कार्याचे एक गणित असते; पण त्या शक्ती ज्या घटनातून व्यक्त होतात त्या घटना घडून येण्यात ज्या व्यक्तींचा सहभाग असतो त्यांना ते गणित समजलेले असतेच असे नाही. मार्क्सने म्हटले आहे, 'असे समजू नका की, सर्वच्या सर्व भांडवलदारांची आपले वर्गीय हितसंबंध इतरांवर जाणून बुजून लादण्याची इच्छा असते.'

मार्क्सच्या इतिहास–विषयक सिद्धान्तात अर्थ-विचाराला महत्त्वाचे स्थान आहे खरे; पण तो अर्थव्यवहार आणि व्यक्ती किंवा वर्ग यांचे आर्थिक हितसंबंध यांची गफलत करता कामा नये. उत्पादन व्यवहारातून माणसा-माणसात जे संबंध निर्माण होतात (उदा. मालक–मजूर, वरिष्ठ–कनिष्ठ, सहकारी, श्रमविभागामुळे होणारे गट इ.) त्यातून वस्तुस्थिती बद्दलची वेगवेगळी मतांतरे उत्पन्न होतात (उदा. 'आहे ही स्थिती समाधानकारक आहे', 'आहे ह्या स्थितीत अमुक सुधारणा पाहिजे', 'आहे ही स्थिती सुधारणे शक्य नाही, ती उलथून पाडली पाहिजे' इ.) त्यातून ऐतिहासिक लढे (उदा. जमीनदार वर्ग विरुद्ध उद्योगधंदेवाले) उभे राहतात व समाजाचे परिवर्तन होते. हा 'क्रांतिकारी वर्ग' (उदा. सरंजामशाहीतील बूर्झ्वा वर्ग किंवा भांडवलशाहीतील मजूरवर्ग) क्रांतिप्रवण होताना संपूर्ण समाजाच्या उद्धाराची (इमॅन्सिपेशन) धुरा हाती घेतो. या काळात जर या क्रांतिकारी होऊ घातलेल्या वर्गातील माणसे स्वतःच्या क्षुल्लक फायद्याकडे लक्ष देऊन वागू लागली तर त्या वर्गाकडे आलेले इतिहासदत्त कार्य कुंठून राहील. फ्रान्स हा देश जर्मनीपेक्षा अधिक क्रांतिप्रवण आहे कारण राजकीय ध्येय प्रणाली फ्रान्समध्ये जर्मनीपेक्षा अधिक समर्थ आहे, असे मार्क्सचे मत होते. मार्क्स सांगत असे की, क्रांतीची प्रक्रिया हे चिकित्सेला उतरणारी प्रक्रिया नसते. 'माणसे इतिहास घडवितात हे खरे; परंतु त्यांना पाहिजे तसा इतिहास ती घडवू शकतात असे नाही; इतिहास घडविण्यासाठी अनुकूल अशी परिस्थिती त्यांना लाभलेली असते असे नाही; त्यांच्या समोर जी परिस्थिती असते ती भूतकाळातून उद्‌भवलेली असते. विद्यमान पिढीच्या मनावर मागील शेकडो पिढ्यांनी घडवत आणलेल्या परंपरेचा पगडा असतो. या विद्यमान क्रांतिकारी पिढीला स्वतःमध्ये व भोवतालच्या स्थितीत क्रांतिकारी बदल घडवून आणायचा असतो; आजपर्यंत जे झाले नाही ते प्रत्यक्षात आणायचे असते; पण या अटीतटीच्या प्रसंगी त्यांना गतकाळातील भुतांना आपल्या मदतीसाठी हाकारावे लागते व त्यांची नावे, त्यांच्या विजयी घोषणा, त्यांची वस्त्रे व शस्त्रे यांची आठवण करून द्यावी लागते. असे केल्यानंतरच जे नवे घडणार आहे ते परंपरातून व ओळखीचे होऊन लोकांना स्वीकार्य वाटू लागते.'

समाजाची विद्यमान आर्थिक घडी प्रत्येक वर्गाला त्याचे त्याचे स्थान ठरवून देत असते. प्रत्येक वर्ग आपापल्या

ठिकाणाहून जे उलगडते आहे ते पाहात असतो व त्याचा अनुभव घेत असतो. त्यामुळे 'शाश्वत न्याया'चे संकल्पन काल-सापेक्ष व स्थानसापेक्ष इतकेच नव्हे तर व्यक्तिसापेक्षही असते. उदा. समाजातील प्रतिष्ठित वर्गाला 'सध्या जे आहे तेच सर्वांना शाश्वत न्याय देणारे आहे', असे (चुकीचे) वाटणे साहजिक होय. उलट समाजातील पिचलेले व दलित असे वर्ग असतात त्यांना समाजातील विद्यमान बंधनांना धुडकावून लावत ज्या नवीन संधी पुढे येत आहेत त्यांचा फायदा घ्यावा असा हुरूप वाटणे स्वाभाविक होय. थोडक्यात म्हणजे, नव्याने उभारी धरणारे वर्ग असे मानणार की, समाजाची नवी रचना करण्याविषयीच्या त्यांच्या कल्पना ह्याच काय त्या विवेकपूर्ण आणि ज्यांना सार्वत्रिक मान्यता मिळू शकेल, अशा आहेत. जर दोन वर्गातील झगडा हा केवळ स्वार्थासाठी असेल तर दोन्ही वर्गात काही देवाण-घेवाण होऊन तो संपविता येईल. पण झगड्यातील प्रत्येक वर्गाला जर असे वाटत असेल की या झगड्यात तत्त्वे व ध्येये यांच्या संबंधातील विरोधी प्रारूपे गुंतली आहेत व या झगड्याच्या निवाड्यावर संपूर्ण समाजाचे भवितव्य अवलंबून आहे, तर अंतिम लढ्याचा क्षण येऊन ठेपला आहे, असे म्हटले पाहिजे.

तथापि, झगड्यात भाग घेणाऱ्या व्यक्तींना किंवा वर्गांना जरी प्रस्तुत झगडा हा दोन ध्येय प्रणालीतील झगडा आहे, असे वाटले तरी त्रयस्थ निरीक्षकांना किंवा अभ्यासकांना तो झगडा त्या स्वरूपाचाच आहे असे वाटण्याचे कारण नाही. 'एखाद्या मनुष्याचे स्वतःविषयी काहीही मत असले तरी इतरांनी त्याला त्या मतावरूनच जोखावे, असे नसते; त्याचप्रमाणे एखाद्या कालखंडातील लोकांची आपण एका संक्रमण काळातून जात आहोत अशी समजूत असली तरी त्या समजुतीप्रमाणेच तो काळ असेल असे नाही. काळ क्रांतिकारक आहे की नाही याचा निवाडा लोकांच्या समजुतीवर विसंबून करता येणार नाही. त्यासाठी वास्तव स्थितीत काही अंतर्विरोध आहेत का, उत्पादनात गुंतलेल्या सामाजिक शक्ती आणि उत्पादनामुळे त्यांच्यात निर्माण झालेले संबंध यात काही तणाव आहेत का, याची तपासणी करावी लागेल.'

इतिहासाच्या क्रांतिकारी टप्प्यावर ती क्रांती घडवून आणणाऱ्या व्यक्ती किंवा वर्ग यांच्या स्वतःसापेक्ष भूमिका आणि अनुभवाला येणाऱ्या घडामोडींच्या बुडाशी असणारे संक्रमणकारी घटक यांच्यील जो भेद मार्क्स व एंगल्स यांनी अभ्यासकांच्या लक्षात आणून दिला ती त्यांची मोठी वैचारिक कामगिरी होय. मार्क्सने म्हटले आहे की, 'एखादा माणूस स्वतःविषयी काय सांगतो व प्रत्यक्षात तो काय आहे यातली तफावत गावच्या वाण्यालाही सहज समजते. आपल्या इतिहासकारांना मात्र ही मर्मदृष्टी हस्तगत झालेली नाही. प्रत्येक कालखंडाने स्वतःविषयी जे सांगितलेले असते ते, ते (इतिहासकार) खरे धरून चालतात.' एखाद्या काळातील धुरिण आपल्या कालखंडातील घटनांची जी कारणे सांगतात किंवा जी काही कारणे आहेत असे त्यांना वाटते, ती तशीच्या तशी इतिहासकारांनी स्वीकारणे म्हणजे त्या कालखंडाविषयीच्या तत्कालीनांना वाटलेल्या भ्रान्तीत सामील होणे होय. उदा. प्राचीन ग्रीकांना किंवा रोमन लोकांना राजकीय तत्त्वज्ञानाचा ध्यास होता आणि मध्ययुगीन समाजावर धर्माचा अंमल होता, असे आपण (तत्कालीन वाङ्मयावरून) धरून चालतो. पण प्राचीनांना किंवा मध्ययुगीन लोकांना उदार-निर्वाह चालवावा लागत होता व तो चालता रहावा यासाठी योग्य त्या संघटित स्वरूपात त्यांना राहावे लागत होते, हे विसरून चालणार नाही. ही अर्थव्यवस्था ही तत्कालीन इतिहासाची किल्ली होय. मार्क्सला आदरांजली वाहाताना एंगल्सने केलेल्या भाषणात म्हटले होते, 'माणसाने जो कल्पनांचा व्यूह निर्माण केला आहे त्यामुळे एका मूलभूत गोष्टीकडे दुर्लक्ष झाले आहे. ती गोष्ट म्हणजे कला, विज्ञान, राजकारण, धर्म इत्यादींचा विचार होण्यापूर्वी मनुष्य समाजाला अन्न-वस्त्र-निवारा या गरजांची पूर्तता करावी लागते. निर्वाहासाठी लागणारे किमान उत्पादन व तिच्या अनुषंगाने निर्माण झालेली अर्थव्यवस्था यांच्या आधारावर त्या त्या कालखंडातील समाजाने आपली राज्य-रचना, कायदा-पद्धती आणि धर्मकल्पना यांचा डोलारा उभारलेला असतो. माणसाचा जो ऐतिहासिक विकास झाला आहे त्याचा उलगडा या अगदी सहज मिळणाऱ्या निरीक्षणाच्या सहाय्याने करता येतो.'

एंगल्सच्या या भाषणातून हे स्पष्ट होते की, समाज




निर्वाहासाठी जी खटपट करतो ती मार्क्सच्या दृष्टीने मूलभूत गोष्ट होती. त्याचबरोबर हेही स्पष्ट होते की, विशिष्ट कालखंडातील अर्थव्यवस्थेच्या अभ्यासातून त्या कालखंडातील राज्यव्यवस्था, कायदे, धर्म यांचाच खुलासा होतो असे नसून मागील कालखंडातील समाज-रचनेपेक्षा सद्यःकालीन समाजरचना कशी वेगळी आहे, त्याचाही खुलासा होतो. एंगल्सने इतरत्र सांगितले आहे की, 'अर्थव्यवस्थेतून निखालस नवीन असे काही निष्पन्न होत नाही; पण तिचा अभ्यास केल्याने आताचे विचार मागील काळातील विचारांपेक्षा किती निराळे व कोणत्या दिशेने विकास पावले आहेत, ते कळून येते.' मागील पिढ्यांनी घडविलेली परंपरा अगदी क्रांतीच्या काळात देखील लोक मानसावर अंमल गाजवीत असतेच, हे मार्क्सचे निरीक्षण आपण पाहिलेच आहे. अमेरिकेतील संयुक्त राज्याला सरंजामशाहीची पृष्ठभूमी नव्हती. तथापि या राष्ट्राने इंग्लंडमधील सरंजामी राजवटीची सर्व परंपरा म्हणजे कायदा-व्यवस्था, धर्म व सांप्रदायिक कटुता, उचललेली होती. भांडवली अर्थव्यवस्था काही निरपवाद भांडवलदारी कल्पना व संस्था यांचा डोलारा उभा करीत नाही. कारण भांडवलशाहीच्याच पोटी जन्माला येणाऱ्या कल्पनांबरोबरच पारंपरिक कल्पनाविश्वाचा प्रभाव समाजावर असतोच. एंगल्स सांगतो की, 'कोणत्याही विचार व कल्पनांच्या विश्वात परंपरा ही आपला पुराणमतवादी (कॉंझर्वेटिव्ह) अंमल गाजवीतच असते. पण त्या विचार व कल्पना विश्वात जो बदल घडून येतो तो त्या समाजातील आर्थिक बदलांमुळे.'

मार्क्सने जो इतिहासाचा सिद्धान्त मांडला त्याचा विषय 'स्थिती' (स्टेट ऑफ बीइंग) हा नसून संक्रमण (ट्रान्सफॉर्मेशन) हा आहे. मार्क्स सांगतो की उत्पादनव्यवस्थेत बदल घडतो, त्यामुळे अर्थव्यवस्थेत बदल होतो व त्यातून समाज बदलतो. पण याचा अर्थ असा नाही की, मार्क्स आर्थिक बदलांवर सर्वस्वी भर देतो. बदल घडवून आणण्यास अनेक घटक कारणीभूत होत असतील; मुद्दा हा आहे की, कोणता घटक सर्वाधिक प्रभावी ठरतो. कुटुंबसंस्थेचे अस्तित्व का टिकून आहे याचा खुलासा जीवशास्त्र किंवा मानसशास्त्र यांच्या आधाराने चांगला करता येईल; पण कुटुंबाच्या रचनेत बदल झाला की नाही? विभक्त कुटुंबाची बहुसंख्या झाली की नाही? ती का झाली? या प्रश्नांची उत्तरे आर्थिक बदलातच शोधावी लागतील. तीच गोष्ट मार्क्सच्या इतिहास-सिद्धान्ताची आहे. सरंजामशाही टिकून का राहिली याचा विचार मार्क्स करीत नाही; समाज सरंजामशाहीकडून भांडवलदारीकडे कसा गेला याचे विवेचन मार्क्सला करायचे आहे व या संक्रमणाचा प्रमुख घटक उत्पादन व अर्थव्यवस्थेत घडून आलेले बदल हा आहे. हे संक्रमण सर्वत्र सारख्याच स्वरूपात घडते असे नाही. इंग्लंडमध्ये भांडवलदारीमुळे जो समाज घडला तोच समाज जपानमध्ये घडला असेल असे नाही; कारण दोघांच्या परंपरा निराळ्या आहेत.

(३)

संक्रमणाच्या अनुषंगाने जो संघर्ष इतिहासात घडलेला दिसतो तो समाजाच्या अपेक्षित घडीविषयी जी परस्परविरोधी मते असतात, त्यामुळे या मतांना जेव्हा नैतिक आशय त्या त्या मतांचे पक्षपाती देतात तेव्हा या मताना ध्येय प्रणालीचे (आयडियॉलॉजी) स्वरूप येते. ध्येयप्रणालीतील या संघर्षांकडे मार्क्स वर्गीय झगडे म्हणून पाहातो.' मालमत्तेची विविध रूपे (फॉर्म्स), सामाजिक उतरंडीतील विविध पायऱ्या यांच्या आधाराने निरनिराळ्या भावना समजुती, विचार करण्याच्या पद्धती आणि जीवनदृष्टी इत्यादिकांनी बनलेला इमला उभा राहातो. ह्या भावना, समजुती इ. त्या त्या वर्गाने आपापल्या आर्थिक स्थितीला आणि सामाजिक संबंधांना धरून घडविलेल्या असतात. वर्गातील व्यक्तीला भावना, समजुती हे मिळतात त्या परंपरा आणि त्या व्यक्तीचा प्रतिपाळ ज्या पद्धतीने झाला ती पद्धती यातून. त्याला वाटते की आपल्याला जी प्रेरणा मिळते आणि आपण ज्या प्रकारे वागतो ते या इमल्यामुळे. (पण खरे पाहता वागणुकीचे मूळ आर्थिक स्थिती व सामाजिक संबंध यात असते.)

व्यक्ती तिच्या कल्पनाविश्वात गुंतून पडते तेव्हा ती त्याच्याकडे केवळ कल्पनाविश्व म्हणूनच पाहात नाही; कारण कल्पनाविश्व हे कल्पनाविश्वच असत नाही. त्या कल्पनाविश्वाचा उपयोग करून घेऊन एक ध्येयप्रणाली उभी राहाते. ध्येयप्रणालीचा अर्थच हा की, कल्पनाविश्वातील कल्पनांशी त्या कल्पना स्वतंत्र व







अनुक्रमणिका

स्वतःच्या पद्धतीने विकास पावणाऱ्या आहेत असे मानून चालविलेला व्यवहार. पण खरे तर हा खेळ कसा खेळला जाईल हे ज्या व्यक्तीच्या डोक्यात तो खेळ चाललेला असतो त्या व्यक्तीच्या आर्थिक स्थितीवर अवलंबून असतो. हे त्या व्यक्तीला माहीत होत नाही. आपल्याला हा खेळ खेळण्याचे खरे स्वातंत्र्य नाहीच आहे हे त्या व्यक्तीला कळले तर ती व्यक्ती तो खेळ खेळणार नाही व मग, ध्येयप्रणाली या संकल्पनेचाच शेवट होईल.

या जटिल विचाराची ओळख 'कायदा' या संकल्पनेचे उदाहरण घेऊन करून देता येईल. समाजाची विद्यमान आर्थिक घडण विधिवत् आहे हे दाखविण्यासाठी कायदे बनविलेले असतात. 'पण कायद्यातील तरतुदी सुसंगतही असाव्या लागतात. ही सुसंगती साधण्यासाठी प्रस्थापित अर्थव्यवस्थेचे कायद्यात पडणारे प्रतिबिंब अधिकाधिक रूपांतरित (म्हणजे मुळापेक्षा वेगळे) करीत जावे लागते. होते काय की, समाजाच्या आर्थिक व्यवहारावर ज्या वर्गाचा पगडा असतो त्या वर्गाच्या हितसंबंधांचे जे उघडे--नागडे, उद्धट आणि भेसूर प्रतिबिंब कायद्यात पडावयाचे, ते ही सुसंगती आणताना तसे राहात नाही. कारण तसे जर झाले नाही म्हणजे कायद्यात विसंगती राहिली किंवा हितसंबंधाचे हिडीस रूप त्यात उतरले – तर कायद्याच्या मूळ उद्देशाला–म्हणजे प्रस्थापित वर्गाचे आर्थिक संबंध हे न्यायपूत आहेत असे चित्र उभे करावयाचे- त्याला धक्का पोचेल.'

मार्क्सने याच विचाराचा अधिक खुलासा करताना म्हटले होते की, समाजातील धनदांडगा वर्ग आपले मतलब उघडपणे इतरांवर लादण्याला तत्त्वतःच काचकूच करतो. निम्न भांडवलदार वर्गातील लोकांचे, उदा. वाण्यांचे, जे मुखत्यार असतात ते स्वतः वाणीच असतात असे नाही; किंवा ते वाण्यांची हिरिरीने तरफदारी करतात, असेही नाही. हे वाण्यांचे मुखत्यार असतात याचा अर्थ इतकाच की, वाणीलोकांची जी ध्येयप्रणाली असते, ती त्यांना (मुखत्यारांना) मान्य असते. हे जे वाण्यांविषयी सांगितले तेच कुठलाही वर्ग व त्याचे राजकीय आणि वाचिक मुखत्यार यांच्या बाबतीत खरे आहे. हे निरनिराळ्या वर्गांचे प्रतिनिधी केवळ आपल्यासाठीच नव्हे तर सर्व समाजाला न्याय, स्वातंत्र्य व सार्वजनिक सुविधा मिळायला हव्यात, असे म्हणत असतात. पण एकूण समाज विषयीचा त्यांचा दृष्टिकोण अर्थव्यवस्थेतील त्यांच्या स्थानानुसार समाजाला होणाऱ्या फायद्यातोट्याचा त्यांनी जो हिशेब बसविलेला असतो, त्याप्रमाणे बनलेला असतो. शुम्पीटर या अलिकडील विद्वानाने म्हटल्याप्रमाणे, 'संपूर्ण समाजाचे कल्याण व साऱ्या देशाचे हित आपल्याला कळते अशी कोणाची कितीही प्रामाणिक समजूत असो, निरनिराळ्या माणसांना 'कल्याण' व 'देशहित' यांची वेगवेगळी समज असते, हेच खरे.' समाजाचा अभ्यास करणारा विद्वानही त्या समाजातील विशिष्ट ठिकाणी स्थिरावून अभ्यास करत असल्याने त्याच्या अभ्यासालाही विशिष्ट डूब अटळपणे मिळालेली असते. एकेका वर्गातील लोक 'न्याय', 'समता', 'माणुसकी' या तत्त्वांची त्यांची त्यांची जी समजूत असते त्या समजुतीवर हटून बसल्यावर वर्ग–वर्गातील संघर्ष अपरिहार्य बनतो. जर मनुष्यांनी केवळ आपल्या व्यक्तिगत मतलबासाठी या तत्त्वांची विशिष्ट मांडणी केलेली असेल, तर ती माणसे, संघर्ष टाळण्यासाठी, तडजोडीला तयार होणे शक्य असते.

'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' या ग्रंथात मार्क्सने म्हटले आहे, 'विशिष्ट कालखंडात प्रभावी ठरलेल्या कल्पना ह्या त्या काळातील सत्ताधारी वर्गाच्या कल्पना असतात.' याचा विस्तार, त्यापूर्वीच्या, 'जर्मन आयडियॉलॉजी' या ग्रंथात मार्क्स व एंगल्स यांनी केला आहे. 'समाजातील साधनसामग्रीवर ज्या वर्गाचा ताबा असतो तोच वर्ग त्या काळातील विचार–विश्वाचाही ताबा घेऊन राहिलेला असतो. ज्या वर्गाची उत्पादन–सामग्रीवर मालकी असते तोच वर्ग समाजातील कल्पनांच्या/विचारांच्या उत्पादनावरही नियंत्रण राखतो. त्यामुळे ज्या समूहांकडे नवविचार प्रसव क्षमता नसते ते समूह या सत्ताधारी वर्गाचे अंकित असतात.'

परंतु, ही स्थिती फार काळ टिकत नाही. एक वेळ अशी येते की, तेव्हा उत्पादनाच्या तंत्रात बदल होतो आणि त्यामुळे समाजातील संबंधातही फरक घडून येतो! 'एखाद्या काळात क्रांतिकारक विचार जन्माला येतात याचा अर्थच असा की त्या काळात समाजात एक क्रांतिकारक वर्ग निर्माण झालेला असतो.' त्यातूनच

एका नव्या कालखंडाचे उद्‌घाटन होते. सारांश, प्रत्येक कालखंडातील प्रभावी कल्पनाविश्व हे त्या काळाच्या सत्ताधारी वर्गाचे कल्पनाविश्व असते हे खरे; पण क्रांतिकारक बदल घडून येतात याचे कारणच असे की, संक्रमणाच्या काळात सत्ताधारी वर्गाचे—आतापर्यंत प्रभावी असणारे कल्पनाविश्व आता लोकांवर अंमल गाजवू शकत नाही.

(४)

मार्क्सने वर्ग–कलहाला इतिहासातील संक्रमणकाळात महत्त्वाचे स्थान दिले आहे. पण 'वर्ग' ह्या संकल्पनेचा निश्चित अर्थ सांगणे ही अवघड गोष्ट आहे. माणसांचे वर्गीकरण निरनिराळ्या संदर्भात निरनिराळ्या प्रकाराने व मुख्यतः वर्गीकरण करणाऱ्याच्या उद्देशानुसार – होऊ शकते. उदा. 'डाव्या हाताने काम करणारे सुतार' हाही एक वर्ग आपण पाहू शकतो. पण असा वर्ग पाहताना हा विचार केला पाहिजे की, 'डावखुऱ्या सुतारांचे परस्परांशी असणारे संबंध आणि अशा सुतारांचे इतरांशी असणारे संबंध' यात काही फरक असू शकतो का? अशा रीतीने आपण जेव्हा गट पाडतो तेव्हा आपल्याला हे पाहावे लागते की, अशा गटातील माणसांना परस्परांशी काही विशेष जवळीक वाटते का? त्यांना सामाईक अशी काही ध्येयप्रणाली आहे का? तसे नसेल, तर संक्रमणाचा खुलासा होण्यासाठी असे वर्गीकरण उपयोगाचे ठरणार नाही.

मार्क्स व एंगल्स यांनी 'जर्मन आयडियॉलॉजी' या ग्रंथात म्हटले आहे की, 'जेव्हा दुसऱ्या वर्गाशी झगडा करण्याची वेळ येते तेव्हाच झगडणाऱ्या व्यक्ती एकत्र येऊन एक वर्ग बनवितात. एरवी, त्या व्यक्ती परस्परांच्या स्पर्धक असल्याने त्यांच्यात असूयेची भावनाच दिसून येते.' मध्ययुगात कोष्टी, सुतार इ. जे कारागीर असत ते आपल्याकडे रोजंदारीवर नोकर किंवा शिकाऊ कामगार ठेवीत. या नोकरांना काय रोजमुरा द्यायचा ते कारागिरांच्या संघटना (गिल्ड) ठरवीत. या रोजंदारीवरील कामगारांचा 'वर्ग' झालेला नव्हता. कारण हे (रोजंदारीवरील) कामगार आपण मालकाला बांधील आहोत, एकमेकांशी आपले देणे घेणे नाही, असे समजत असत. या कामगारांची महत्त्वाकांक्षा आपण कारागीर बनून मालक व्हावे अशी असे. आपली संघटना करून कारागिरांच्या संघटनेशी झगडा करावा, कारण ती संघटना आपली पिळवणूक करत आहे, असे त्यांच्या मनातही येत नसे. तेव्हा हे रोजंदारीवरील कामगार एका 'वर्गा'चे होते, असे म्हणता येणार नाही. 'एटीन्थ ब्रूमेर' या पुस्तकात मार्क्सने 'वर्ग' या संकल्पनेचा आणखी पद्धतशीर विचार केला आहे. लाखो कुटुंबे जेव्हा अशा आर्थिक स्तरावर जगत असतात की ज्यामुळे त्यांची जीवनशैली, त्यांचे हितसंबंध, त्यांची संस्कृतीच इतर वर्गांपेक्षा निराळी पडते आणि ती कुटुंबे त्या इतर वर्गांशी वैर बाळगतात, तेव्हा त्या कुटुंबांचा स्वतंत्र वर्ग तयार होतो. अल्पभूधारक शेतकऱ्यांचे स्थानिक परिसरात परस्परांशी जवळचे संबंध असतीलही पण त्यांच्या सामाईक हितसंबंधांमुळे त्यांची जर जमात (कम्युनिटी) झाली नसेल, त्यांच्या निरनिराळ्या स्थानिक जातीतील जिव्हाळ्याचा देशभर फैलाव झाला नसेल, त्यांची राजकीय संघटना बांधली जात नसेल, तर त्यांचा वर्ग होणार नाही.'

माणसांच्या निरनिराळ्या संचात आर्थिक इतर बाबतीत वस्तुनिष्ठ फरक असतो व त्यातून त्या संचांचे वर्ग होतात. पण त्याच बरोबर त्या संचातील व्यक्तीत परस्परांविषयी आंतरिक जिव्हाळा असावा लागतो. माणसा–माणसात जे वस्तुनिष्ठ फरक असतात त्यांचा आधार घेऊन त्यांचे संच तयार करणे (उदा. डावखुरी माणसे, द. म. रु. ३०,०००/- पेक्षा जास्त पैसे मिळविणारी माणसे इ.) शक्य असते. पण एका संचातील व्यक्तींना परस्परांविषयी आपुलकी वाटते की नाही हे ठरविणे अवघड असते. असा बंधुभाव निर्माण करणे त्याहूनही कठीण होय. 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो'ने पुकारा केला होता की, 'मजुरांना राष्ट्र असत नाही.' पण अडचण ही होती की, मजुरांना तसे वाटत होते का? राष्ट्रभावना ही त्यांच्या रक्ताशी वर्गभावनेपेक्षा जास्त घट्टपणे एकजीव झाली होती?

(५)

मार्क्सने इतिहासाचा जो सिद्धान्त मांडला, त्याप्रमाणेच इतिहास घडतो किंवा तसा तो घडणे अपरिहार्य आहे असा त्याला विश्वास होता का? तात्त्विक जडवादाची जी रूपे आपल्याला परिचित आहेत त्यात नियतिवादा(डिटरमिनिझम)चा आढळ काही प्रमाणात होतच

असतो. 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो'त म्हटले आहे की, 'श्रमिकवर्गाचा विजय अटळ आहे.' 'कॅपिटल' मध्येही सांगितले आहे की, इतिहासातील शक्ती अपरिहार्यपणे अटळ असणारी स्थिती घडवून आणण्यासाठी कार्य करीत असतात.

काही वर्षानंतर मार्क्सने आपल्या मित्राला लिहिलेल्या पत्रात म्हटले होते, 'इतिहासाला वळण देणाऱ्या लढ्याची सुरूवात जर निश्चितपणे अशा अनुकूल नशिबाची (फेव्हरेबल चान्स) साथ घेऊन केली तर तो लढा सहजपणे यशस्वी होईल.' त्याही नंतरच्या एका पत्रात मार्क्स सांगतो की, 'निसर्गातील बदल जितक्या अटळपणे घडतात तितक्याच अपरिहार्यतेने उत्पादन व्यवस्थेतून तिच्या नाशाची (निगेशन) बीजेही निर्माण होतात.' पण या वाक्यातील नियतिवादाला काहीशी मुरड, याच पत्रातील नंतरच्या विवेचनात मार्क्सने घातली. 'कॅपिटल' या ग्रंथाचे परीक्षण करणाऱ्याचा उल्लेख करून मार्क्सने म्हटले होते, 'मी पश्चिम युरोपातील भांडवलशाहीच्या उदयाचे जे वर्णन केले आहे त्याला या परीक्षणकर्त्याने विपरीत रूप दिले आहे. त्याला असे वाटते की, मी (भांडवलशाहीच्या उदयाविषयी) मांडलेला सिद्धान्त म्हणजे इतिहासाचे एक सार्वत्रिक व सार्वकालिक तात्त्विक स्वरूप आहे; व कुठल्याही परिस्थितीतील समाजापुढे याच प्रकारचे भवितव्य वाढून ठेवले आहे. परंतु मला हे मान्य नाही. (तो एकाच वेळी फार मोठा मान देतो आहे व त्याचबरोबर माझी निर्भर्त्सना करीत आहे.)'

म्हातारपणी मार्क्स (व एंगल्सही) फार परिपक्व झाला होता. तारुण्यातील उर्मटपणा आणि ठामपणा त्याने सोडून दिला होता. त्याचे सिद्धान्त तेच होते पण मांडणी मवाळ झाली होती. क्रांतीचा पायरव त्याला वारंवार ऐकू येई आणि त्याच्या आशा पल्लवित होत. पण ही उभारी व विश्वास आता त्याच्या सिद्धान्तापासून तर्काने निष्पन्न झालेला नव्हता तर त्याच्या स्वभावाचा तो भाग होता.

**संदर्भ :** मार्क्सिझम-फिलॉसॉफी ॲण्ड इकॉनॉमिक्स, थॉमस सोवेल, जॉर्ज ॲलन ॲण्ड अन्विन्, लंडन १९८५.

## लेखकांचा परिचय

❀ **प्रा. रत्नाकर बापूराव मंचरकर**

मराठीचे सेवानिवृत्त अध्यापक, मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक, साहित्य, शिक्षण आणि समाज यांवर वैविध्यपूर्ण लेखन, संपादन व शोध निबंध, लेखनाबद्दल राज्य पुरस्काराने सन्मानित.
***पत्ता :*** श्री स्वामी समर्थ, १९, नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, सावेडी, अहमदनगर - ४१४ ००३.

❀ **डॉ. चंद्रशेखर बर्वे**

स. प. महाविद्यालय पुणे येथे मराठीचे विभागप्रमुख व प्राध्यापक.
***पत्ता :*** बी ४/३, पी डब्ल्यूडी सोसायटी, रामबाग कॉलनी, नवी सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

❀ **डॉ. सो. रा. शेंडे**

प्रपाठक, इतिहास विभाग, एस्.पी. कॉलेज, पुणे-३०.
***पत्ता :*** इतिहास विभाग, एस्. पी. कॉलेज,पुणे - ३०.

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

## संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| संशोधन साधना । डॉ. वसंत ज. जोशी | ६० रु |
| आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| वागीश्वरी डॉ. गो. के. भट | ६० रु |
| प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. बा. लेले | ५० रु |
| गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु |
| शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । ग. भा. पाटणकर | १०० रु |
| धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु |
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| हिंदुधर्मांची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक ध. ना. जोशी यांनी के सागर ग्राफिक्स अँण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.